# भारतीय साम्राज्य.

पूर्वार्ध

पुस्तक तिसरें.

आर्येतिहास व भूगोल.

नारायण भवानराव पावगी

( कृत. )

# भारतीय साम्राज्य.



नारायण भवानराव पावगी.

यानें रचिलें असे.



तें

पुणें येथें "सत्यप्रकाश" छापखान्यांत छापिलें.



शके १८१९



विजयनाम संवत्सरे.

—— :o: ——



किंमत १४ आणे.

श्री.

सद्गुरु चरणारविंदीं

नमन करून

हीं

ग्रंथरूपी

यथाशक्ति व यथामति केलेली

अत्यल्प

# देशसेवा.

## नारायण भवानराव पावगी

यानें

आपल्या दयितआर्यभूमीच्या ठिकाणीं

असलेल्या अत्युत्कट

**प्रीत्यर्थ**

सकल

आर्यभगिनींस व आर्यबांधवांस

प्रीतिपूर्वक

अत्यादरानें समर्पिली असे.

# भारतीय साम्राज्य.

## प्रस्तावना.

इतिहासोत्तमादस्माज्जायन्तेकविबुद्धयः ।

भारतीय साम्राज्याचें हें तिसरें पुस्तक होय. पहिल्या पुस्तकांत **देशवृत्तान्त** दिला असून, त्याचे नऊ भाग केले आहेत. १ **देशस्थिति व वर्णन**; २ । ३ **उद्भिज्ज संपत्ति**; ४ । ५ **कृषिकर्म पद्धति**; ६ **प्राणिजातिसंपत्ति**; ७ **खनिजसंपत्ति**; ८ **वातावरणमीमांसा**; आणि ९ **भरतखंड भूरचना**.

दुसऱ्या पुस्तकांत **आर्यलोक व त्यांचें बुद्धिवैभव**, याविषयींचें साद्यंत वर्णन आहे, आणि ह्याचे पांच भाग केले आहेत. १० **आर्यांचें मूलनिवासस्थान**; ११ **आर्यांची सामाजिक रचना व धर्मसंस्था**; १२ **आर्यभाषा**; १३ **वेद व वेदांगें** आणि १४ **महाकाव्यें व गद्यपद्यादि भाषाशास्त्र**.

प्रस्तुतच्या तिसऱ्या पुस्तकांत **आर्येतिहास व प्राचीन आर्यभूगोल**, यांविषयींचा सविस्तर वृत्तान्त दिला असून, त्यांत मजला उपलब्ध असलेली सर्व माहिती वाचकांपुढें

सादर केली आहे. ह्याचे पांच भाग केले आहेत. १५ **आर्येतिहासाच्या न्यूनत्वाचीं कारणें; १६ वेदकालीन इतिहास; १७ उत्तरहिंदुस्थानां**तील **प्राचीन नृपावलि; १८ दक्षिण हिंदुस्थानां**तील **प्राचीन नृपावलि;** आणि **१९ प्राचीन आर्यभूगोल.**

आमचें सुप्रसिद्ध व अति पुरातन **भरतखंड नानाविद्याविशारद** असून, तत्संबंधीं त्याची फार प्राचीनकाळापासूनच ख्याति आहे. तें यच्चावत् सर्व **शास्त्रान्वेषां**त प्रवीण असल्याविषयीं सर्वांस महशूर आहे, आणि अखिल **कलासमुदाय** हा देखील त्यानेंच उदयास आणिला असल्याविषयीं त्याची दिगन्त कीर्ति आहे.

**तत्वज्ञानां**त आमची बरोबरी करणारा आजपर्यंत एकही देश ह्या भूतलावर उदयास आला नाहीं. फार तर काय सागावें, पण **भारतीय** तत्वज्ञानाचा इतिहास म्हटला म्हणजे ह्या भूगोलावरील प्रत्येक देशांतील तत्वज्ञानाचा एक संक्षिप्त इतिहासच होय, असेंही प्रतिपादन केलें असतां मोठेसें साहस किंवा अतिशयोक्ति होणार नाहीं.

एके ठिकाणीं **कझिन्**नें असें म्हटलें आहे कीं,

"The history of Indian philosophy is the abridged history of the philosophy of the world."

एक **फ्रेंच** शोधक **लुई जेकलियट्** ( M. Louis Jocolliot ) हा आपल्या ( La Bible Dans L'Inde ) **भरत**-

खंडांतील **पवित्रशास्त्र** नामक पुस्तकांत असें लिहितो कीं, सर्व राष्ट्रांचें आदिस्थान **भरतभूमि** होय. येथूनच हर-एक शास्त्राची उत्पत्ति झाली. येथूनच सर्वांस कायदे कानू मिळाले. येथूनच सर्वांस धर्मबंधन प्राप्त झालें. आणि नीतिशिक्षण देखील येथूनच सर्वांच्या पदरीं पडलें.

" India is the world's cradle; thence it is, that the common mother in sending forth her children even to the utmost West, has in unfading testimony of our origin bequeathed us the legacy of her language, her laws, her *morale*, her literature, and her religion "

" Traversing Persia, Arabia, Egypt, and even forcing their way to the cold and cloudy north, far from the sunny soil of their birth: in vain they may forget their points of departure; ... ... ...But time and ruin united fail to obliterate the ever legible stamp of origin. "

( La Bible Dans L'Inde. ).

P. VII—VIII.

आमच्या **भरतभूमीनेंच पौरस्त्य** आणि **पाश्चात्य** देशांत आपल्या **ज्ञानदीपानें** सर्वत्र प्रकाश पाडला, असें विदेशीयांस देखील कबूल करावें लागतें.

" Can there be any absurdity in the suggestion that the India of six thousand years ago, brilliant, civilized, overflowing with population, im-

pressed upon Egypt, Persia, Judea, Greece, and Rome, a stamp as ineffaceable, impressions as profound, as these last have impressed upon us ? "

( La Bible Dans L' Inde. )

P. 18.

" Let us repeat it even to satiety if those whom we call the ancients were progenitors of modern nations—so was ancient India the initiatrix of all the civilization of antiquity. "

( La Bible Dans L' Inde. )

P. 296 .

तेव्हां, अशा प्रकारें ज्या **भरतभूमींत** सर्व शास्त्रें पूर्ण दशेप्रत पावलीं, ज्या ठिकाणीं आमच्या पूर्वजांनीं सर्व विद्यांच्या खाणी खणून ठेविल्या, आणि जेथें **ज्ञानोदधी**-ला चोहोंकडून संपूर्ण भरती आली, तेथें इतिहासासारिख्या अमूल्य ग्रंथांची, किंवा सशास्त्र आणि पद्धतशीर रीतीनें लिहिलेल्या **इतिहासा**ची कशी उणीव राहिली, याबद्दल विचार करतां करतां, माझी अल्पमती तर खरोखरच अगदीं गुंग होऊन जाते.

पण, एकवार प्राचीन इतिहास पुनश्च मनांत आणिला, आणि आमच्या ह्या अतिपुराण देशावर, भिन्नधर्म विदेशीयांनीं अनेक स्वाऱ्या करून जो **प्रलयाग्नि** पेटविला त्याचा विचार केला, ह्मणजे आमच्या प्राचीन इतिहासाची व इतर अमूल्य ग्रंथसंपत्तीची काय वाट

लागली असावी, किंवा त्यांची कशी वाताहात झाली असावी, या विषयींची एक निभ्रान्त कल्पना मनांत येते.

आतां, ही कल्पना कोणती म्हणाल तर ती अशी कीं, **इसलाम**शाहीच्या त्या बेबंद नगरींत, आणि रात्रंदिवस **दीनदीन्** चालणाऱ्या त्यांच्या त्या कोलाहलांत, तसेंच त्यांच्या त्या पशुतुल्य क्रौर्यांत, व त्यांच्या त्या रुधिरप्रिय प्रत्यपकारांत, आमच्या ह्या ऐतिहासिक ग्रंथसंपत्तीची आगदीं राखरांगोळी झाली, यांत तिळमात्रही शंका नाहीं,

कारण, त्या **बिडालाक्षी**च्या वंशजांस ग्रंथसंपत्तीचा विध्वंस करण्याची खरोखरच मोठी हौस ! ! ! **आलेग्झांड्रियां**तील विस्तीर्ण आणि अमूल्य पुस्तकालयाचा फडशा ह्या **अविन्धां**नींच उडविला. आमच्या **भारतीय ग्रंथरत्नाकरा**वर देखील त्यांनींच धाड आणिली.

आतां, त्या **अविंधां**नीं आमची अमूल्य ग्रंथसंपत्ति लुटून फस्त करावी; त्या **म्लेंछां**नीं आमचा विशाल रत्नोदधि भस्मसात् करावा; आणि त्या **धर्मांधां**नीं आमच्या जगद्वंद्य पूर्वजांचे अपूर्व मानसिक श्रम होमकुंडांत घालून आपल्या नेत्रांचें पारणें फेडावें; हें सर्व अत्यन्त निंद्य व गर्ह्य तर खरेंच. त्या योगानें आम्हांला अतीव खेद उत्पन्न होऊन आमचें हृदय पोळतें, हेंही निर्विवादच आहे. आणि त्यामुळेंच आमचा दुःखाग्नि

एकदम भडकतो, हें देखील कोणाच्यानें नाहीं म्हणवणार नाहीं. तथापि, ह्या त्यांच्या दुष्कृत्याबद्दल फारसें आश्चर्य वाटण्यासारिखें नाहीं. कारण, ते बोलून चालूनच शनटी ! व ते स्वभावतःच **अरसिक** ! तेव्हां, त्यांनीं कोणताही अनाचार केला तरी तो त्यांस शोभण्यासारखाच आहे !

परंतु जे आपणांस सुधारलेले ह्मणून ह्मणवितात; जे रसिक ह्मणून नांवाजले जातात; ज्यांच्या सुशिक्षितपणाची धवलकीर्ति सर्वत्र पसरलेली आहे; त्यांच्या हांतून देखील अशा प्रकारचें कांहीं अमंगल कृत्य झालें असल्यास, आमच्या दुःखाला पारावार नाहीं, व आमच्या कष्टाला सीमा नाहीं.

रावबहादूर **नीलकंठ जनार्दन कीर्तने** यांनीं, **मराठ्यांच्या** बखरीवर टीका ह्मणून, एक लघु पुस्तक छापलें आहे. त्यांत एतद्विषयक, ह्मणजे आमचे ऐतिहासिक अमूल्य ग्रंथ **अग्निनारायणा**ला अर्पण केले असल्याविषयींचा थोडासाच मजकूर वाचून, माझें मन अगदीं विव्हल झालें. आणि मजला असें वाटूं लागलें कीं, आह्मांला केवळ एका **स्वातंत्र्यदेवतेनें** सोडल्या कारणानें आमच्या देशाची वाताहात, व आमच्या ह्या **दयितआर्यभूमीचें** सर्वतोपरि अपरिहार्य नुकसान होत आहे!! इतकें मनांत येऊन माझ्या अंतःकरणाला फारच वाईट वाटलें; आणि

**ह्या आर्यावर्त मातृके**च्या अन्तर्वेदना, तिचे ते अनिवार्य विलाप, आणि तिच्या त्या दुःसह यातना पाहून, माझ्या नेत्रांनीं तर खरोखरच **अश्रु** ढाळले.

**मराठ्यां**चा इतिहास **ग्रांट्डफ्**नें लिहिला असल्याविषयीं सर्वांस महशूर आहेच. ह्या गृहस्थानें सतरा हजार रुपयांचा निव्वळ तोटा व झीज सोसून, अनेक **बखरी** व नानाविध ग्रंथावरून ठिकठिकाणची उपलब्ध असलेली सामग्री हरएक प्रयत्नानें मिळविली. तदनंतर ती एकत्र करण्यासाठीं, त्यानें पाण्यासारखा पैसा खर्चला, आणि दीर्घ परिश्रमानें व **भगीरथ** प्रयत्नानें **मराठीसाम्राज्या**चा इतिहास एकदांचा तयार केला. सबब त्याबद्दल तर खरोखर आह्मी त्याचे फारच आभारी व ऋणी आहोंत.

परंतु ह्या ज्या ठिकठिकाणच्या **बखरी** त्यानें आणविल्या, हीं जीं **हस्तलिखितें** त्यानें जमा केलीं, हे जे असंख्य **लेख** त्यानें मिळविले, ते सर्व आतां कोठें आहेत? ते चोरीस गेले काय? नाहीं. त्यांचाही जाणून बुजून **अविंधां**नीच चुराडा केला काय? नाहीं. किंवा ते **कीटकां**नीं खाल्ले? अथवा **श्वापदां**नीं गट्ट केले? नाहीं. तर मग त्यांचें झालें तरी काय?

रावबहादूर **कीर्तने** म्हणतात कीं, कित्येक राजकीय कारणें मनांत आणून, ते मुद्दाम **अग्निनारायणा**ला **स्वाहा** केले. “आमच्या देशबांधवांनीं कित्येक लहान

लहान कामांत, व कित्येक मोठमोठ्या लढायांत, अशीं शूरत्वाचीं कृत्यें केलीं कीं, तीं कल्लुद व त्याचे अनुयायी यांसही शोभावीं. त्यांच्या आठवणीनें लोकांत उगीच आपल्या पूर्वसत्तेविषयीं गर्व, व त्या गर्वाचें सहचारी जें परराज्यसत्ताशत्रुत्व तें राहूं नये, ह्मणून हे लेख जाळले असें महाराष्ट्र देशांतील पुष्कळ गृहस्थांचें मत आहे. यांत खरोखर ' मेलेल्या ह्मशीस हंडाभर दूध, ' असेंही कांहीं झालें असेल, यांत संशय नाहीं. हें काय असेल तें असो; परंतु अजूनही क्षुल्लक कारणाकरितां सरकारी लेख जाळण्याची जी सुरुवात आहे, त्यावरूनच ही वरील प्रकारची दंतकथा निघूं शकते. शिवाय, असलें कृत्य हें एकोणीसाव्या शतकास व इंग्रजासारख्या विद्वान लोकांस युक्त नव्हे. "

पेशवाईतल्या दफ्तरांतील कित्येक वृद्ध आणि वाकबगार कारकुनांचें असें ह्मणणें आहे कीं, या " कागदांची जाणूनबुजून होळी केली. " आतां, या ह्मणण्यास दस्तऐवजी कांहींएक पुरावा नाहीं. किंवा तत्संबंधीं कोणापाशीं लेखही नाहीं.

परंतु त्या बाबतींत रावबहादुर मजकूर यांचें असें ह्मणणें आहे कीं, " आमचे एक हुषार मित्र रा. रा. कै० दाजी साहेब सरंजामे ( जे इनामकमेटींत कांहीं दिवस नोकर होते ते ) असें म्हणतात कीं, यासंबंधीं ग्रांट साहे-

बाचे व दक्षिणचे **कमिशनर** साहेबाचे कांहीं लेख त्यांनीं पाहिले आहेत. त्यावरून या कागदांचा जाणूनबुजून **नाश** केला, असें मानण्यास हरकत नाहीं. ”

**हर ! हर !** असें झालें असल्यास अति शोचनीय, व अत्यन्त खेदाची गोष्ट होय. **ईश्वरेच्छा** बलवत्तर आहे. व **सत्तेपुढें शहाणपण** नाहीं.

असो. आमच्यावर **प्रभुत्व** चालविण्यासाठीं, **ईश्वर** संकेतानुरूप ज्यांची ज्यांची ह्मणून योजना झाली, त्या सर्वांनीं आमच्या अमूल्य **ग्रंथसंपत्ती**ची यथेच्छ **होळी** करून, तज्ज्वालाग्नीनें आपल्या नेत्रकमलांचें मनसोक्त पारणें फेडल्यावर, आमचे प्राचीन **इतिहास**, आमचे प्राचीन **ग्रंथ**, आमचा प्राचीन **काव्यरत्नोदधि**, इत्यादि कोठून उपलब्ध होणार ? अर्थातच नाहीं.

मुक्काम पुणें, मंगळवार.
मार्गशीर्ष शुद्ध ११ शके
१८१५ विजयनाम संवत्सरे.

**नारायण भवानराव पावगी.**



# अनुक्रमणिका.

## पूर्वार्ध.

# पुस्तक तिसरें.

## भाग १५ वा.

### आर्येतिहास व भूगोल.

आर्य इतिहास व भूगोल—भारतीय इतिहास उपलब्ध न हो-ण्याचीं कारणें—महमदकृत संहार—भारतीय इतिहास असावा अशाविषयीं प्रमाण—अबुल फाजिल यानें केलेल्या इतिहासाचीं साधनें—चंदाच्या इतिहासांत उल्लेख केलेली माहिती—जयसिंगानें मिळविलेली सामग्री, आणि कल्पद्रूम रोजनिशी—बखरी—त्यांचा लोप—त्यांची अनास्था—ऐतिहासिक पोंवाडे व त्यांचें महत्व.

## भाग १६ वा.

### वेदकालीन इतिहास.

इतिहासाचें खरें स्वरूप—ऋगूवेद हा मानवी स्थितीच्या मूल-पीठिकेचा मूर्तिमंत इतिहास—इतिहासाचीं अन्य साधनें—पुराणें, शिला लेख, व ताम्रपत्रें—प्राचीन इतिहास आजपर्यंत कोणी लि-

हून ठेविलेला नसल्यामुळें त्यापासून ओढवलेला परिणाम—इतिहासापासून होणारा कार्यभाग—प्राचीन भारतीयांची इतिहासासंबंधीं समज—प्राचीन व अर्वाचीन इतिहास लेखनपद्धतींत अंतर—पाश्चात्यांची इतिहास परिपक्वता—आम्हां पौरस्त्यांची तत्संबंधीं उणीव, व तिचीं कारणें—संस्कृताशिवाय इतर भाषेंतील ऐतिहासिक चीजें, व इतिहास—वैदिक ऐतिहासिक स्थलें—आदिपुरुष मनु—मनूपासून झालेलीं कुटुंबें—वेदकालीन समाजस्थिति—आर्य व अनार्य—वेदकालीं ब्राम्हण क्षत्रियादि वर्णांची रचना—वर्ण व्यवस्थेचें इंगित—वर्णांतर, व आपापसांत रोटी आणि बेटी व्यवहार—आर्यांची नीति व आत्मोन्नति.

---

# भाग १७ वा.

## उत्तर हिंदुस्थानांतील प्राचीन नृपावलि.

सूर्यवंशी राजे—त्यांचा काल—चंद्रवंशी राजे—त्यांचा काल—मगध देशांतील राजे, व त्यांचा काल—चंद्रगुप्त—अशोक—शुंग राजे—काण्व नांवाचे ब्राह्मण राजे—अंध्रभृत्य—गुप्त राजे—बंगाल देशचे राजे व त्यांचा काल—कनोजचें राज्य व त्याचा काल—दिल्लीचें राज्य, व पृथिवीपति—मालव देशचे राजे, व त्यांचा काल—गुजराथचे राजे, व त्यांचा काल.

---

# भाग १८ वा.

## दक्षिण हिंदुस्थानांतील प्राचीन नृपावलि.

दक्षिणा पथ, व त्याची मर्यादा—महाराष्ट्र व त्याची मर्यादा—महाराष्ट्रांतील राजे, व त्यांचा काल—शातवाहन राजे—

---

# भाग १९ वा.

## प्राचीन आर्य भूगोल.

कनोज—अयोध्या—पाटणा—गया—राजगृह—मोदागिरी—अवंती—तिबेट, मुलान, इत्यादींचीं प्राचीन नांवें—मध्यदेशाचे पांच भाग, व त्यांच्या राजधान्या—प्राची देश व त्यातील प्रांत—अंग देश—वंग देश—पुंड्र देश—सुह्म देश—कामरूप व लौहित्य देश—प्रतीची विभाग व त्यांतील प्रांत—सिंधु देश—महोर्धग्राम—सैंधुस्थाम—पाटलपूर—कच्छ प्रांत—गुर्जर प्रांत—आदर्शावलि व अर्बुद पर्वत—राजस्थान—सुराष्ट्र—अर्जुनगड, व कुंतलपूर—भृगुक्षेत्र अर्बुद पर्वत—दक्षिणापथ विभाग, व त्यांतील प्रांत—दक्षिणकोसल आणि विदर्भ—कलिंग देश अथवा तेलंगण—महाराष्ट्र देश—त्याची व्याप्ति व सीमा— धनककट—विजयनगर किंवा हंपी—तगर उर्फ जुन्नर—निधिवासक्षेत्र—बारशी—कौंडिन्यपुर—क्षेसुर गांडगापूर—करवीर क्षेत्र—तेथील प्रेक्षणीय स्थलें—त्याची प्राचीन व अर्वाचीन स्थिति—परशुराम क्षेत्र व कोंकण—कोंकणाची राजधानी—ठाणें—वसई—निर्मलेश्वर व तुंगारेश्वर—चौल व रेवदंडा—चौक येथील प्रेक्षणीय कामें व राजघराणीं—रेवतीक्षेत्र—परशुराम क्षेत्राची सीमा, व गोमंतक प्रांत गोंवा बेट, व हिंदु लोकांचें धर्मांतर—सिद्धपुर—चुडामणि नामक द्वीप—द्वीपवती अथवा पंचक्रोशी—आज्यद्वीप व त्याची आख्यायिका—केरलप्रांत, व मलबार किनारा—चोल देश, व कारोमांडल किनारा—पूर्वघाट अथवा महेन्द्र नील पर्वत—पांडयदेश—कुमारी भूशिर—लंका बेट, व त्यांचीं दुसरीं नावें—सिंहलद्वीप—ताम्रपाणि—निरक्षदेश—रत्नद्वीप—टाप्रोबेन—सालिकी—झिलन—सेरिन्दीव व सीलोन—पौलस्तिपूर—मारीच द्वीप, व त्यांचे कथानक.

---

# भारतीय साम्राज्य.

पूर्वार्ध.

## पुस्तक तिसरें.

### आर्येतिहास व भूगोल.

# भाग १५ वा.

### इतिहास आणि भुगोलासारख्या ग्रंथांची न्यूनता, व त्याचीं कारणें.

आर्य इतिहास व भूगोल.

ज्या हिंदूनीं सर्व शास्त्रांत गहन प्रवेश केला; ज्यांच्या दीर्घ परिश्रमानें विद्येचीं सर्व अंगें विकासाप्रत पावलीं; व ज्यांनीं अहर्निशी सखोलान्वेषण केल्यामुळें, एकंदर सर्व कलासमुदाय उदयास आला; त्यांच्या हातून

1. "It gave me inexpressible pleasure to find myself in the midst of so noble an amphitheatre, almost encircled by the vast regions of Asia,

( पुढें चालू. )

**इतिहास** आणि **भूगोलासारख्या** विशेष महत्वाच्या विषयांत येवढी मोठी उणीव कशी राहिली, याविषयीं समाधानकारक आणि खात्रीपूर्वक असें चांगलेंसें अनुमान बिलकुल करितां येत नाहीं.

ज्ञानवृक्षाच्या[१] प्रत्येक शाखेवरील मधुर फळें ज्या

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

which has ever been esteemed the *nurse of sciences*, the *inventress of delightful* and *useful arts*, the scene of *glorious actions*, fertile in the productions of *human genius*, and infinitely diversified in the forms of religion and Government in the laws, manners, customs, and languages, as well as in the features and complexions of men."

(Sir William Jone's voyage to India August 1783.)

1. "Is it to be imagined that a nation so highly civilized as the Hindus, amongst whom the exact sciences flourished in perfection, by whom the fine arts, architecture, sculpture, poetry, music, were not only cultivated, but taught and defined by the nicest and most elaborate rules, were totally unacquainted with the simple art of recording the events of their history, the characters of their princes, and the acts of their reigns? Where such traces of mind exist, we can hardly believe that there was a want of competent recorders of events, which synchronical authorities tell us were worthy of commemoration."

हिंदूंनीं चाखून पाहिलीं, व ज्यांची तत्कालीन बुद्धिमत्ता पाहून, या भूतलावरील सर्व लोक अजूनही तोंडांत बोटें घालतात, त्यांजला इतिहासशास्त्रच माहीत नव्हतें, किंवा आपल्या पूर्वजांची परंपरा कशी लिहून ठेवावी याविषयीं ते अनभिज्ञ होते, अथवा गतगोष्टींचें विवेचन कसें करावें हें त्यांस अवगतच नव्हतें, असें तर खचित बिलकुल म्हणतां येणार नाहीं. निदान, घडून आलेल्या वृत्तांताचा गोषवारा, किंवा तत्संबंधीं साधारण टिपण, अथवा कालानुक्रमाचें वर्णन, इतकें करून ठेवण्याला, त्यांच्यासारख्या विशाळ कल्पनेला तरी अगदींच अवघड नव्हतें, यांत तिळमात्रही शंका नाहीं.[1]

भारतीय इतिहास उपलब्ध न होण्याचीं कारणें.

आतां, कोणी असा प्रश्न करील कीं, जर प्राचीन इतिहास, किंवा तत्समान इतर संक्षिप्त लेख, इत्यादि लिहून ठेवण्यास अडचण नव्हती, तर पुराण काळचा

1. "If we consider the political changes and the convulsions which have happened in Hindusthan since Mahamood's invasion, and the intolerant bigotry of many of his successors, we shall be able to account for the paucity of its national works on history, without being driven to the improbable conclusion, that the Hindus were ignorant of an art which has been cultivated in other countries from almost the earliest ages."

(Tod's Rájasthan. P. VIII.)

समग्र इतिहास, अथवा ज्याला इतिहास हें नांव शोभण्यासारिखें आहे, असा एकही ग्रंथ कां उपलब्ध होऊं नये, किंवा दृष्टीस देखील पडूं नये ? ह्या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं फारसें दूर जावयास नलगे. कारण, आमचे इतिहासचसे काय, पण दुसरे असंख्य व बहुत उपयुक्त ग्रंथ, **इस्लाम** धर्माच्या **समशेरशाहीनें**[1] केवळ भस्मसात् करून,

महमदकृत संहार,

तज्जन्य ज्वालाग्नीनें तिनें आपल्या नेत्रकमलांचें पारणें फेडलें. इतकेंच नाहीं तर, अप्रतीम व पुराण मंदिरें, अति सुंदर व भव्य भवनें, आणि विशेष पवित्र व प्राचीन देवालयें, हीं देखील तिनें अगदीं रसातळास मिळविलीं; आणि इतिहासाचीं भांडारें, व तत्संबंधीं प्रत्यक्ष आणि दुसरीं अप्रत्यक्ष साधनें, हीं अजिबात नाहींशी करून टाकिलीं.

अशा प्रकारच्या बेबंदनगरींत आणि झोटिंगपादशा-

---

1. "After eight centuries of galling subjection to Conquerors totally ignorant of the classical language of the Hindus; after almost every capital city had been repeatedly stormed and sacked by barbarous, bigotted, and exasperated foes; it is too much to expect that the literature of the country should not have sustained, in common with other important interests, irretrievable losses."

( Tod's Rãjasthan. P. IX).

2. "No such clemency was shown to Mattra

( पुढें चालू )

हींत, जीव रक्षणाच्या संबंधानें जो तो अगदीं संत्रस्त होऊन गेल्यामुळें, ज्याला त्याला "देमाय धरणी ठाय" असें झालें होतें. तेव्हां असल्या स्थितींत, कशाचा इतिहास आणि कसले ग्रंथ? गेली घटका ती आपली, पुढें काय अरिष्ट ओढवेल तें परमेश्वराला ठाऊक; अशा चिंतेंत व फिकिरींत दिवस घालविण्याची दुर्घट वेळ येऊन ठेपली होती; मग ह्या धामधूमीच्या व अणीबाणीच्या वेळीं, शांतिसमयांतील विद्याविलास आणि चित्तवेधक ग्रंथसंपत्ति कोठून सुचणार? वास्तविक पाहतां, अशा प्रसंगीं, त्यांचें वारेंही लागण्याची मुष्किल!!!

महमदीय प्रलय होमकुंडांत आमच्या असंख्य व

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

one of the most celebrated seats of the Hindu religion. During a halt of twenty days, the city was given up to plunder, idols were broken, and the temples profaned. * * * All agree that he (Mahmud) was struck with the highest admiration of the buildings which he saw at Mattra," * * *

(Elphinstone's India. P. P. 554-555)

1. "When our princes were in exile, driven from hold to hold, and compelled to dwell in the clefts of the mountains, often doubtful whether they would not be forced to abandon the very meal preparing for them, was that a time to think of historical records."?

अमूल्य ग्रंथांची **आहुति** पडली, याविषयीं तर आतां मुळींच शंका नाहीं. परंतु, तींत ऐतिहासिक अथवा इतर ग्रंथ कोणत्या जातीचे किती होते, हें मात्र समजण्यास बिल्कुल मार्ग नाहीं. त्या "**विडालाक्षी**" **महमदानें** सर्वच प्रदेश उध्वस्त करून टाकिले असते तर, आमच्या **भरतखंडांतील** अद्यापिही दृष्टिगोचर होत असलेला प्रचंड ग्रंथसमूह अजिबातच नाहींसा झाला असता. परंतु सुदैवानें तो प्रसंग टळल्यामुळें, तत्कालीन पुस्तकालयें त्याच्या तडाक्यांतून वांचलीं. तथापि, अमूल्य ग्रंथसंपत्ति व नानाविध कलासंग्रह, आणि पवित्र धर्मसंस्था व अनुपम मंदिरें, ह्यांचा ह्या क्रूर व रानटी **अविंधानीं** बहुतेक चुराडाच करून टाकिला, असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं.

---

1. "Immense libraries, in various parts of India, are still intact, which have survived the *devastations* of the Islamite. The collections of Jesselmer and Putton, for example escaped the scrutiny of even the lynx-eyed Alla, who conquered both these kingdoms, and who would have shown as little mercy to those literary treasures, as Omar displayed towards the Alexandrian Library."

( Tod's Rájasthan. P. VIII).

"Scenes of devastation, plunder, and massacre commenced, which lasted through ages; during which nearly all that was sacred in religion or

( पुढें चालू )

असो. हिंदु राष्ट्राचा समग्र इतिहास नाहीं; निदान तो सांप्रतकाळीं तरी कोठेंही उपलब्ध नाहीं; ही गोष्ट आतां निर्विवादपणें सिद्ध आहे. तथापि, हिंदुस्थानावर महमदशाहीचा विध्वंसरूपी नांगर फिरण्यापूर्वी, तो कदाचित् (किंबहुना खचित) असावा, असें अनुमान करण्यास पुष्कळ कारणें आहेत. कारण अबूलफाजिलनें जो प्राचीन हिंदुस्थानचा इतिहास लिहिला, तो तयार करण्यास भारतीय इतिहासाचीं कांहीं तरी मूळसाधनें त्याच्या हातीं लागलीं असावींत. परंतु पुढें कालांतरानें, तीं सर्व भक्षी कालाच्या जबड्यांत सांपडून, किंवा इस्लाम समशेरशाहींत चुरडून जाऊन त्यांचा नाश झाला असावा. चंदानें पृथिवीपति जो

भारतीय इतिहास असावा अशा विषयीं प्रमाण.

अबुल फाजिल यानें केलेल्या इतिहासाचीं साधनें,

चंदाच्या इतिहासांत उल्लेख केलेली माहिती,

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

celebrated in art was destroyed by these ruthless and barbarous invaders."

( Tod's Rājasthan. P. 217 Vol. I.)

1. "It is now generally regarded as an axiom, that India possesses no national history; to which we may oppose the remark of a French Orientalist, who ingeniously asks, whence Abulfazil obtained the materials for his out-lines of ancient Hindu History." ( Tod's Rājasthān. P. VII ).

**पृथुराज**[1] याचा संपूर्ण इतिहास लिहिला आहे. त्यांत ज्या माहितीचा उल्लेख केला आहे त्यावरून, तत्कालीन ऐतिहासिक ग्रंथ त्यावेळीं होते यांत शंका नाहीं. तथापि, दुर्दैवानें तेही सर्व ग्रंथ नाहींसे झाले. **कल्हणकृत राजतरंगिणी**[2] नांवाचा **काश्मीरचा** इतिहास, हा तर सर्वांस महशूर असून, तो आज मित्तीसही उपलब्ध आहे. त्यावरून तर असें निर्विवाद सिद्ध होतें कीं, इतिहास लिहून ठेवण्याची पद्धत त्या काळीं, ह्मणजे इ० स० च्या सुमारें बाराव्या शतकांत, चांगली प्रचारांत होती. इतकेंच नाहीं तर इतिहास ह्मणजे एक शास्त्रांग आहे, असें तत्कालीन लोक पुष्कळ अंशीं समजून होते.

---

1. "In the heroic history of Pritheiraj, the last of the Hindu sovereigns of Delhi, written by his bard Chund, we find notices which authorizes the inference that works similar to his own were then extant, relating to the period between Mahmood and Shabudin (A. D. 1000-1193) : but these have disappeared."

(Tod's Rājasthan. P. IX).

2. * * * The Raj Tarangini, or History of Cashmir, which clearly demonstrates that regular historical composition was an art not unknown in Hindusthan, and affords satisfactory ground for concluding that these productions were once less rare than at present, and that further exertion may bring more relics to light."

(Tod's Rájasthán. P. VII).

जयसिंगानें मिळविलेली सामग्री, आणि कल्पद्रुम रोजनिशी.

जयपूरचा राजा जयसिंग हा मोठा विद्याविलासी होता. इतकेंच नाहीं तर तो सर्व शास्त्रकलापांचा चांगला पोषिंदाही होता. त्यानें रजपुतांचा इतिहास तयार करण्यासाठीं ठिकठिकाणची सामग्री, व साहित्यें, मिळविलीं होतीं. तसेंच त्यानें कल्पद्रुम[1] नांवाची एक रोजनिशी देखील ठेविलेली असून, तींत तो घडून आलेली हरएक महत्वाची गोष्ट नमूद करीत असे. शिवाय, त्याच्या पदरीं उत्तम प्रकारचा ग्रंथसंग्रहही होता. परंतु दुर्दैवानें तो सर्व नाहींसा झाल्यासारखें दिसतें. कारण, त्याच्या कुव्यसनी वंशजांनीं त्याची धूळधाण आणि दर्दशा करून टाकिली.[2]

बखरी.

तदनंतर अगदीं अर्वाचीन काळीं, म्हणजे गेल्या सतराव्या आणि अठराव्या शतकांत, व सार्वभौम पेशव्यांच्या कारकीर्दीत,

1. "Like some of the renowned princes of Timur's dynasty, Jeysing kept a diary termed Calpadruma, in which he noted every event."
(Tod's Ràjasthan. P. XIV).

2. "I have reason to believe that there existed more copious materials, which his profligate (Jeysing's) descendent, the late prince, in his division of the empire with a prostitute, may have disposed of on the partition of the Library of the state, which was the finest collection in Rajasthan." (Tod's Ràjasthan P. XIV).

ऐतिहासिक बखरी, पराक्रमी पुरुषांचीं चरित्रें, आणि हरएक अणीबाणीच्या प्रसंगाचा वृत्तांत, व मोठमोठ्या लढायांची हकीकत लिहिण्याचा प्रचार फारच पडला होता. अशा वेळीं, देशांत शांतता असून इतिहास-लेखन-कलेस जरासें प्रोत्साहन किंवा थोडासा राजाश्रय असता तर, आमचा **भारतीय** इतिहास अल्पकाळांतच चांगल्या नांवारूपास आला असता. आतां सदरहू बखरी, वीरचरित्रें, आणि संग्रामवृत्तांत, यांत क्वचित्प्रसंगीं कल्पनेचाही भाग असून, त्यांची भाषासरणी पोरकट व निर्जिव आहे. परंतु त्यांजवरच विद्येचा संस्कार झाला असता ह्मणजे त्यांचें पौराणिक व आख्यानरूप जाऊन, त्यांस शास्त्रीय व इतिहासाचें खरें स्वरूप प्राप्त झालें असतें. त्यांची एकतानता नाहींशी होऊन, त्यांस व्यापकत्व आलें असतें. आणि त्यांतील बालिश निरूपण व रुक्षता जाऊन, त्यांस प्रौढता व मनोहरत्व प्राप्त झालें असतें.

त्यांचा लोप.

परंतु आमचें दुर्दैवच ओढवलें, तेथें असला सुदिन कोठून येणार? अगोदरच सतरावें आणि अठरावें शतक ह्मटलें ह्मणजे ोठ्याच धामधुमीचें; आणि तशांत एकोणीसाव्या शतका-ऱ्या प्रथम चरणांत दुसऱ्या **बाजीरावासारख्या कुलां-ाराची** कारकीर्द. मग काय विचारावयाचें!!! अग्नींत ल पडल्यासारिखें होऊन, **हिंदुसाम्राज्यांत** आणि

विशेषतः **महाराष्ट्र** देशांत तर एकच कल्होळ उडाला, व हाहाःकार होऊन गेला. जिकडे तिकडे बेबंद नगरी आणि झोटिंगपादशाही झाली. राज्यांत चोहोंकडे बखेडा मातला. कोणाची कोणास दाद नाहींशी झाली. **नाना फडणवीस** कैलासवासी झाल्यामुळें, हें अवाढव्य **राज्य-शकट** चालविण्यास योग्य व समर्थ असा राजकार्यधुरंधर पुरुष कोणीच राहिला नाहीं. तेणेंकरून परकीयांचें फावल्या-सारिखें झालें. आणि राज्यांत दुई माजून, **इंग्रजांचें** कृष्ण-कारस्थान बळावलें. त्या कारणानें प्रजेचा विश्वास नाहींसा झाला; दुर्नीति फैलावली; स्वावलंबन, आणि नीतिधैर्य, हीं साहजीकच लयास गेलीं; विद्येचा ऱ्हास झाल्यामुळें स्वप-राक्रमशीलता नाहींशी झाली; आणि आमचा **प्रभु** दुराच-रणी, निर्बल, निःसत्व, व न्यायपराङ्मुख होत चालल्यानें **ब्राह्मणशाही** नष्ट होऊन, तिचें सार्वभौमत्व लयास गेलें. अशा स्थितींत जीविताचें संरक्षण होणेंच दुर्घट झालें, व त्यामुळें ज्याला जी वाट सुचली तिचें त्यानें अवलंबन केलें.

अशा प्रकारें शेवटल्या **बाजीरावानें**[1] **ब्राह्मणी** पाद-शाहीचा शेवट केल्यावर, आह्मां **हिंदूंचें** सर्वच कांहीं लयास गेलें. आमचें राज्य नष्ट झालें. आमची **सिंह-गर्जना** मावळली. आमचा दरारा नाहींसा झाला. आमचें शौर्य व पराक्रम अस्तास गेले. आमची एकी अजिबात

---

१ शेवटचा बाजीराव.

मोडली. आमची सत्ता संपुष्टांत आली. आमची स्वतंत्रता नष्ट झाली. आमचा ज्ञानदीप अगदीं मावळला. आणि आमच्या ग्रंथसंपत्तीची वाताहात झाली.

त्यांची अनास्था.

**ब्राह्मणी** राज्य नष्ट झाल्यानंतर सुमारें अर्धशतकपर्यंत त्या **महाराष्ट्रीय** अमूल्य ग्रंथसमुहाकडे, जणूकाय अत्यंत दुःखामुळें कष्टी झाल्या कारणानें, कोणी ढुंकूनही पाहिलें नाहीं. तेणेंकरून कीटकांनीं त्यांजवर यथेच्छ ताव मारिला; कांहींस कसरीनें खाल्लें; कांहींस वाळवी लागल्यामुळें त्यांची मृत्तिका झाली; आणि राहिल्या साहिल्यास **वाण्यांचीं** दुकानें पाहावीं लागलीं.

आमच्या अनास्थेमुळें, आमच्या अमूल्य जुनाट ग्रंथांची कोणत्या प्रकारें, केवढी धूळधाण होऊन, शेवटीं त्यांची कशी माती झाली, हें वाण्याच्या दुकानांत, जिन्नस बांधण्याकरितां, त्यांच्या पुड्या झालेल्या ज्यांनीं पाहिलें आहे, त्यांच्या लक्षांत सहजीं येण्यासारखें आहे. तसेंच, वाळवी लागल्या कारणानें मृत्तिकारूपी ग्रंथांचे ढीगच्या ढीग ज्यांच्या दृष्टिगोचर झाले आहेत, त्यांसही ह्याची कल्पना तेव्हांच होण्यासारखी आहे.

आतां, हें लिहिणें कदाचित् कोणास आलंकारिक वाटेल, किंवा अतिशयोक्तीचेंही दिसेल. परंतु तसें बिलकुल

नसून, तें स्वानुभवानें व आधारपूर्वक लिहिलें आहे. **काव्ये-तिहाससंग्रहा**चे प्रसिद्ध ग्रंथकार असें लिहितात कीं:—

"आमच्या दुसऱ्या एका स्नेह्यास वाण्याच्या दुकानांत सटरफटरांत शोधतां शोधतां दहा बारा जुने संस्कृत ग्रंथ सांपडले; त्यांपैकीं कांहीं, वरील ग्रंथाप्रमाणेंच मोठ्या योग्यतेचे असून, अत्यंत दुर्मीळ आहेत."

दुसऱ्या ठिकाणीं प्रसंगानुसार सदरहू ग्रंथकर्ते आणखी असेंही ह्मणतात कीं,

"कारण जे कांहीं जुन्या माहितीचे लेख आमच्या लोकांपाशीं आज आहेत त्यांची स्थिति फार वाईट आहे. कोठें बखरी कसरीच्या भक्षस्थानीं पडल्या आहेत, कोठें मुलांनीं त्यांचीं लिखितें करून फाडून टाकिल्या आहेत, कोठें त्यांचीं पानें गहाळ झालीं आहेत, कोठें जुने लेख इतके जीर्ण झाले आहेत कीं, त्यांस हस्तस्पर्श करणें तो फार जपून करावा लागतो, व कोठें तर त्यांस वाण्याच्या हातून सोडवावें लागतें. ही जुन्या कागदपत्रांची स्थिति अति अनिष्ट होय."

"तेव्हां **मराठी साम्राज्याची** जी मोठी अवाढव्य इमारत बांधली गेली होती, तिची पडकीं भिंताडें गोटेगोटे या **भरतखंड**भर पसरलेले आज दृष्टी पडतात". × × ×

सुमारें अठ्ठावीस एकुणतीस वर्षामागें **कविचरि**

नांवाचा ग्रंथ प्रसिद्धीस आला असून, त्याच्या शेवटीं एक ग्रंथकारांची नामावलि, आणि ग्रंथांची लांबच लांब यादी दिलेली आहे. ह्यांपैकीं कांहीं ग्रंथ बिलकुल उपलब्ध नसून, ते देखील इतर ग्रंथसमुहाप्रमाणेंच कालचक्राच्या दंष्ट्रेखालीं चिरगडल्यामुळें, किंवा महमदशाहीच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें, अथवा कीटकवणिग् इत्यादिकांच्या हस्तगत झाल्यामुळें, त्यांचा अगदीं संहार झाला असावा.

असो. एकंदरीनें पाहतां, आमच्या बखरी ऐतिहासिक दृष्टीनें खरोखर फारच महत्वाच्या[1] आहेत; व ह्यांच्याच आधारानें ग्रांटडफ्नें नामांकित मराठ्यांचा इतिहास चला आहे. तेव्हां, अशा अमूल्य ग्रंथांची इतकी अनास्था असा संहार व्हावा, ही अत्यंत शोचनीय गोष्ट होय.

आतां महाराष्ट्र देशांतील एक आणखी विशेष महत्वाचा ऐतिहासिक ग्रंथसमूह म्हटला ह्मणजे पोंवाडे[2] होत. ह्यांत मराठी साम्राज्यांतील धामधुमीची हकीकत, अणी-

ऐतिहासिक पोंवाडे त्यांचें महत्व.

1. "There was no doubt that the Maratha .khars were most valuable historic records, and ght be fairly said to be almost unique in Hindu—:rature." (Mr. Telang.)

2. * * * "Songs in the popular language, on ics of popular interest. They have had a far :ater influence over the mind of the people than

(पुढें चालू)

बाणीचे प्रसंग, वीर पुरुषांचे पराक्रम, जयश्रीचा घोष, आणि पराजयोद्भूत उद्वेग, इत्यादिकांचें फारच हृदयद्रावक वर्णन, विशेष मार्मिकपणानें केलें आहे. हे **पवाडे** गात असतां, गांवढळ व **शेतकरी** लोकांचें मन तल्लीन होई, **मावळी** लोकांचे बाहू स्फुरण पावत, आणि **मराठ्यांस** वीर्यश्री चढे. अशा प्रकारें **मराठ्यांचा** यशोदुंदुभि ऐकण्याचा प्रसंग पूर्वी वारंवार येत असे. किंबहुना त्या जयश्रीचा घोष, त्या काळीं, अहोरात्र व एकसारखा आमच्या कर्णरंध्रांत पडे.

कारण, फुरसुदीच्या वेळीं करमणुकीकरितां, धर्मकृत्यांत गोंधळ ह्मणून, आणि युद्धप्रसंगांत वीर्यश्री येण्यासाठीं, हे पवाडे हम्मेश ह्मणण्याची चाल सर्व जातींत असे त्यामुळें अखिल **महाराष्ट्र देश**भर देशाभिमान अगदीं हा जणूकाय ओतप्रोत भरलाच होता. हें राष्ट्रीयकवन, वीर्य व करुणार-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

the poetry of Wàman Pandit, Ràmdàs, Tukàrám or Shridhar, all of whom flourished in the 17th century—rude and vulgar as their diction is in comparison— because they can be understood by every one." (Historical Ballads of the Màràthas. By Mr. Acworth C. S. P. VI.)

1. "It is not to be supposed, however, that they (the Màràthas) are without a poetry of their own which is entitled to rank as a national product. With

( पुढें चालू )

सानें इतकें थबथबलेलें आहे कीं, तें ऐकिलें ह्मणजे पूर्व पराक्रमाची आठवण होऊन, गतवैभवाबद्दल अतीव खिन्नता वाटते; आणि एकंदर सर्व ऐश्वर्याची क्षणभंगुरता मनांत येऊन, सहृदय असा कोणीही मनुष्य अश्रु ढाळल्यावांचून खचित राहत नाहीं. ज्या **महाराष्ट्रीयांनीं** आपल्या पराक्रमानें आपणांस राजकीय बंधनांतून मुक्त करून घेतलें, ज्यांनीं आपल्या बाहुबलानें अखिल **भरतखंड** पादाक्रांत केलें, व ज्यांनीं बुद्धिचातुर्यानें त्यांतील सर्व

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

the Màràthas, as with every warlike race, the feelings of the commons have taken shape in ballads, which however rude and inartificial in their language, their structure, and their rhythm, are the genuine embodiment of national enthusiasm, and are dear, and deserve to be dear, to those who repeat and those who listen to them. With their records of victory and defeat, of heroic deeds and heroic men, of battles, conquests, assassinations and intrigues, they preserve, wherever they are sung, the national memories of Máharâshtra, its noble struggle to independence, its period of victorious expansion, its dominion, and its decline; and over the plains of the Deccan, and the deep valleys and bold ridges of the Sahyadris, from vallage to village, the humble

( पुढें चालू )

राजेरजवाड्यांस आपल्या आज्ञापत्राप्रमाणें वर्तावयास लाविलें, त्यांस अशी दीनदशा आणि परतंत्रता प्राप्त होऊन दुसऱ्याच्या ओंजळीनेंच पाणी पिण्याचे दिवस आल्यावर, त्यांच्या कष्टाला काय पारावार ! ! !

असो. अशा प्रकारचे नामांकित **पोंवाडे** देखील, दिवसानुदिवस, ठार बुडत चालले. आणि त्यांपैकीं जेवढे उपलब्ध झाले तेवढेच **काळाच्या** जबड्यांतून वांचविण्याचा प्रयत्न, राजश्री **शंकर तुकाराम शाळिग्राम** आणि मेहेरबान् **आक्वर्थ** साहेब मुंबईचे म्युनिसिपल कमिशनर,

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

Gondhali still travels, and still to rapt and excited audiences sings of the great days when the armed fathers of the men around him *gave laws* at the spear's point to all the princes of India, or retreated wounded and dismayed, before the sword of the sea-dwelling stranger. It is characteristic of the honesty of this class of poetry that many of the best Maratha ballads commemorate defeats. One of the finest in this volume tells of the fatal day of Paniput, and another of that of Kirkee. But most of them deal naturally with happier occasions when the spear of the Màrátha triumphed."

( Historical Ballads of the Márâthas. By )
Acworth P. II.

यांनीं झटून केला नसता तर, हें अद्वितीय लोककुतूहल
पुनश्च आमच्या दृष्टीस देखील पडतेंना. परंतु मोठ्या

---

1. " It would not be easy to exaggerate the interest with which these old songs are listened to, or the fervent feelings which they excite—feelings less demonstrative but far more deep and abiding than the hysterics passion of a Moslem Mohurrum. It is something higher and nobler than a mere emotional impulse which his ballads evoke in the breast of a Mārathā. They recall to him not the inventions of a diseased vanity, or the legends of a spasmodic fanaticism, but great historical deeds and figures which crowded round the nation's mighty development, the music and the glow with which the great wave swept on, or the wail and the darkness of its reflux. It seems strange and difficult to believe that the " wearied ploughman," whom we see driving his bullocks across the field, can be moved by such thoughts and dwell upon such scenes. But the fact is that the Maratha, differing herein from every other native of India, has strong national feelings. Other peoples in this country are knit together by other causes; they are castes religions; sects, tribes; but the Maráthàs are a nation and from the Brahman to the ryat they glory in the fact. They are, therefore, susceptible to a class of emotion which is foreign to the nature of other Indian races. The songs of the Rajput glorify the valour of his individual ancestors in paltry inter-

( पुढें चालू )

मेहनतीनें, दीर्घ प्रयत्नानें, आणि पदरच्या खर्चानें, हा

---

(मागील पृष्ठावरून पुढे चालू.)

necine feuds; the scope of Moslem heroic poetry has a wider range, but its characteristic is religious fanaticism and its inspiration is religion, not patriotism but the ballads of the Maráthàs are the ballads of the men of Mahàràshtra (the "Great Nation" ), as such, and burn through and through with patriotic fervour. The times that gave birth to them have passed away, but they keep alive that love for the scenes and institutions of their country which is so conspicuous among the Maràthás. They add to the dignity and self respect of the peasant and they help to make him a more and not a less loyal subject of the British crown, as he has an honourable past to look back upon, and manly traditions to preserve. He is not the man who will yield himself up to the wild hysterics of small agitators; he has the solid self respect which true national feeling engenders; he has known when to fight and how to fight; he has won his freedom once from fanatical oppressors, and he is able and willing to acquiesce in the established fact which gives him peace and justice and perfect liberty. "

"The ballads of the Maràthàs, therefore, possess a more than common interest, the unwritten lays which have lived in the memories of men, and are sung from house to house among the peasantry and also the urban papulation"

(Historical Ballads of the Maráthàs edited by Messrs. Acworth and Sháligrám P. II. III. )

अमूल्य ऐतिहासिक ग्रंथसमुदाय चिरस्थायी करण्याचें जें यश त्यांनीं संपादिलें, त्याबद्दल त्यांची जेवढी ह्मणून तारीफ करावी तेवढी थोडीच.

सदरहू विवेचनावरून, **भारतीयांचा** इतिहास अजिबात नाहींच, असें प्रतिपादन करणें अगदीं अविचाराचें व धाडसाचें वाटतें. कारण, ज्या लोकांस विद्येची मोठी अभिरुचि, इतिहासाची विशेष गोडी, आणि इतिवृत्त लिहून ठेवण्याविषयीं नैसर्गिक प्रेरणा, त्यांजकडून राष्ट्रीय इतिहास लिहून ठेवण्याविषयीं, आजपर्यंत इतका अनादर झाला असेल, किंवा तो कोणी देखील लिहून ठेविला नसेल, असें संभवनीयच दिसत नाहीं. कदाचित्, अशा प्रकारचा अल्पस्वल्प इतिहास केव्हां तरी उदयास आला असून, विध्वस्त झालेल्या इतर ग्रंथसंपत्तीबरोबर तोही मावळला असावा, असें चांगलें अनुमान होतें.

याउपरही, आह्मां हिंदूंचा राष्ट्रीय इतिहासच नाहीं, अशी वैकल्पिक कल्पना केलीच तर, अशा महत्वाच्या विषयांत हिंदूंची इतकी उणीव कशी राहिली, याविषयीं समाधानकारक आणि खात्रीपूर्वक अनुमान कांहींच करितां येत नाहीं. तथापि, अशा स्थितींत देखील इतिहास तयार करण्यास, किंवा ऐतिहासिक माहिती मिळविण्यास, ज्या ज्या साधनांची ह्मणून अवश्यकता आहे, तीं तीं सर्व उपलब्ध आहेत, यांत बिलकुल शंका नाहीं.

# भाग १६ वा.

## वेदकालीन इतिहास.

आतां, प्रत्येक देशाचा इतिहास ह्मटला ह्मणजे त्यांतील राष्ट्राच्या स्थितीचें व एकंदर हकीकतीचें यथार्थ वर्णन असून, त्यांत राष्ट्राची बाल्यावस्था किंवा पूर्वस्वरूप, युवावस्था किंवा उन्नति, आणि वृद्धावस्था किंवा निकृष्टदशा, यांचें क्रमशः विवेचन केलेलें असतें.

इतिहासाचें खरें स्वरूप.

वास्तविक पाहतां, इतिहास म्हणजे केवळ राजांची नामावली, किंवा कालक्रमाचा निर्देश, अथवा घडलेल्या गोष्टींची परंपरा, इतकेंच नसून, त्यांत विशेषतः राष्ट्रांचा उत्कर्ष आणि अपकर्ष यांचीं कारणें, त्यांचा परस्पर कार्यकारणभाव, त्यापासून त्या भूमीवर व राष्ट्रांवर झालेला परिणाम, किंबहुना अन्य देश व अखिल जगत् यांजवर तज्जन्य घडलेले संस्कार, याविषयींचें वर्णन असतें. आणि ह्मणूनच इतिहासावलोकनानें तत्संबंधीं चांगलें ज्ञान प्राप्त होतें. आणि राष्ट्रांचे आचार, विचार, व रीतिभाति, त्यांचे संप्रदाय व त्यांच्या संस्था, त्यांचे परा-

क्रम व त्यांचे मनोव्यापार, त्यांचे नीतिविचार व त्यांची तत्वान्वेषणपरायणता, इत्यादि गोष्टींची संपूर्ण माहिती ज्यांत मिळते, त्यालाच **इतिहास** हें नांव देण्यास तत्वदृष्ट्या कोणतीही हरकत नाहीं.

ऋग्वेद हा मानवी स्थितीच्या मूलपीठिकेचा मूर्तिमंत इतिहास.

ह्या दृष्टीनें पाहिलें ह्मणजे **ऋग्वेद** हा **आर्योन्नती**चा, व अखिल **मानवी** सृष्टीच्या **मूलपीठिके**चा, केवळ मूर्तिमंत इतिहासच होय. **ऋग्वेदा**च्या साद्यन्त अवलोकनानें असें खात्रीपूर्वक कळून येतें कीं, आमचे **आर्य** हे जगत्तलांवरील **आदिकुटुंब** असून त्यांच्याच शाखा सर्वत्र पसरल्या होत्या. **वेदाध्ययना**वरून **आर्यहिंदूं**चें स्थित्यंतर कसकसें झालें, व त्यांनीं कशा पराक्रमानें कोणते देश जिंकिले, याविषयीं देखील उत्तम प्रकारची माहिती मिळते. फार तर काय, पण **आर्य** राष्ट्राच्या बाल्यावस्थेंतील आणि उन्नतावस्थेंतील मनाची स्थिति, त्यांचे यच्चावत् आचारविचार, त्यांचें विशाल बुद्धिवैभव, आणि त्यांचे प्रत्यक्ष **उद्गार** देखील, जसेच्या तसेच व अगदीं हुबहूब कळून येण्यास केवळ **ऋग्वेद**च खरें साधन होय.

इतिहासाचीं अन्य साधनें.

असो. **ऋग्वेदा**नंतर **छान्दोग्योपनिषद्** हें ऐतिहासिक माहितीचें दुसरें साधन आहे. या उपनिषदाच्या पांचव्या अध्यां-

यांत इतिहास व पुराणें यांचा नामनिर्देश दिसून येतो. **बृहदारण्यकां**त अनेक **ऋषीं**च्या कुलगोत्रांची वंशावली दृष्टीस पडत असून, **रामायण** व **महाभारतां**त नाना विध गाथा, ऐतिहासिक कथानकें, आणि घडून आलेल्या गोष्टींचें मोहक वृत्तान्त आढळून येतात. **गार्गीसंहितें**तील **युगपुराणां**त, **हिंदुस्थानाशीं यवनां**च्या व्यवहाराच्या संबंधानें दिग्दर्शन आहे. **बाण**-कृत **हर्ष**चरितांत तत्कालीन व उपयुक्त अशी चांगली माहिती असल्याचें दिसून येतें. **विल्हण**कृत **विक्रमांक चरितां**त ऐतिहासिक माहितीचें प्राचुर्य आहे. ह्या कवीनें सर्व **हिंदुस्थान**भर दीर्घ पर्यटन केलें असून, त्यानें आपल्या जन्मभूमीची, व पाहिलेल्या अनेक नगरांची, तसेंच **चालुक्य** वंशाची, सप्रमाण आणि तथ्य अशी हकीकत दिली आहे. **नीलमत** नांवाचा इ० स० च्या ६।७ व्या शतकांतील एक ग्रंथ हल्लींच उपलब्ध झाला असून, त्याच्या आधारानेंच **कल्हण** कवीनें **राजतरंगिणी** नांवाचा इतिहास केला असल्याविषयीं हल्लीं नवीन शोध लागला आहे. त्याप्रमाणेंच **क्षेमेन्द्र** व **हेलाराजकृत तरंगिणी**ची हकीकत आहे. **कल्हणकृत राजतरंगिणी** तर सुप्रसिद्धच आहे. **कल्हण** हा बाराव्या शतकांत ( इ० स० ११४८—६७ च्या सुमारास ) झाला असून, त्यानें

काश्मीरच्या राजांचा इतिहास लिहिला आहे. त्यालाच **राज**तरंगिणी असें ह्मणतात.

पुराणें, शिला लेख, व ताम्रपत्रें.

या प्रमाणें, ह्या व अन्य ग्रंथांत आणि विशेषतः पुराणांत, ऐतिहासिक माहिती इतस्ततः पसरलेली असून, शिवाय **शिलालेख** व **ताम्रपत्रें** यांत तर तत्संबंधीं वृत्तांताची केवळ समृद्धीच दिसून येते. तथापि, शास्त्रीय ऐतिहासिक विवेचनपद्धतीची आमच्या **भरतखंडांत** खरोखर आजपर्यंत मोठी उणीव असून, **राष्ट्रा**च्या इतिहासाच्या संबंधानें आमचे **हिंदु**लोक फार मागसलेले आहेत असें सद्यःस्थितीवरून तरी कबूल करणें भाग पडतें.

प्राचीन इतिहास आजपर्यंत कोणी लिहून ठेविलेला नसल्यामुळें त्यापासून ओढवलेला परिणाम.

आमच्या **भरतखंडा**चा साद्यंत इतिहास शास्त्रीय पद्धतीवर आमच्या **भारती**यांपैकीं कोणी तरी यापूर्वीच लिहून ठेविला असता तर, त्यापासून अनंत फायदे झाले असते. पराक्रमी, साहसी, आणि नीतितत्वविशारद, अशा भाग्यशाली पुरुषांचें हुबेहुब चरित्र आमच्या डोळ्यांसमोर रात्रंदिवस उभें राहिलें असतें, आणि त्या योगानें आमचा, **स्वदेशाभिमान** निरंतर जागृत राहिला असता. इतकेंच नाहीं तर, आमचें अमूल्य **स्वातंत्र्य** व तत्संबंधीं स्पृहणीय **वैभव**, ह्यांस आम्ही बहुतकरून कधींच आंचवलें

नसतों. कारण, गत गोष्टींच्या अनुभवानें व तज्जन्य ज्ञानानें आम्ही आपलें पाऊल खाड्यांत न टाकितां, विचारानेंच टेंकिलें असतें. व आमच्यांत जे जे पराक्रमी पुरुष होऊन गेले, त्यांस अशा प्रकारच्या इतिहासाचें अवलोकन करण्याचा संस्कार असतां तर ते फारच दूरदर्शी निपजले असते, यांत संशय नाहीं. अमक्या गोष्टीनें अमका परिणाम झाला किंवा होतो, असें ज्ञान इतिहासाचें अवलोकन केल्यानें प्राप्त होतें. आणि तें झालें ह्मणजे वर्ज्यावर्ज्य वस्तूविषयीं चांगला विचार सुचतो. हिंदुस्थानांत एक ह्मण आहे कीं, "बावन ठेंच खाय तो बावन वीर होय." त्याप्रमाणे अनेक वेळां चुका होऊन, त्यांच्या परिणामाचे शतशः घाव सोसावे, तेव्हांच सोलीव ज्ञान प्राप्त होतें; व तेणेंकरून आपल्या देशाचें व देशबांधवांचें कल्याण झाल्यावांचून कधींही राहत नाहीं.

इतिहास ह्मणजे अनुभवजन्य ज्ञानाचा एक अक्षय्य निर्झरच असल्यामुळें, त्यांत गतगोष्टींचें इंगित व मर्म हीं दर्पणाप्रमाणें तात्काळ दृष्टिगोचर होतात. आणि या कारणानेंच ज्या ज्या देशांत इतिहासमर्मवेत्ते व राजकार्य धुरंधर असे पुरुष उदयास येतात, तेथें तेथें, स्वतंत्रदेवतेचे अपूर्व विलास, व तिचे परमकृपाकटाक्ष, सर्वत्र दृष्टीस पडतात.

' इतिहासापासून होणारा कार्यभाग.

इतिहासाचें मूलतत्व व तज्जन्य लाभ ह्यांस आमचे

प्राचीन भारतीयांची इतिहासासंबंधीं समज.

पूर्वज पराङ्मुख होते, किंवा तत्संबंधीं त्यांस बिलकुल ज्ञान नव्हतें, अथवा त्या विषयांत त्यांची अनास्था होती, असा कांहींच प्रकार नसून, वास्तविक पाहिलें तर सुमारें साडे चार हजार वर्षांपूर्वींच इतिहासापासून उद्भवणारे फायदे आमच्या **भारतीयांस** पूर्णपणें अवगत असल्याचें चांगलें दिसून येतें.

**इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धयः।**
**पंचेभ्यःइव भूतेभ्यो लोकसंविधयस्त्रयः॥**
**इतिहास प्रदीपेन मोहावरण घातिना।**
**लोकगर्भगृहं कृत्स्नं यथावत् संप्रकाशितम्॥**

( महाभारत. )

सदरहू श्लोक **महाभारतांतील** असल्यामुळें, त्याचें प्राचीनत्व सहज लक्षांत येईल.

प्राचीन व अर्वाचीन इतिहास लेखनपद्धतींत अंतर.

उत्तम प्रकारच्या इतिहासाचें चांगलें अवलोकन झाल्यानें, बुद्धीस तीव्रता व परिपक्वता येते. इतकेंच नाहीं तर, त्यापासून सर्व प्रकारच्या मोहाचें निरसन होऊन यच्चावत् गोष्टी प्रकाशमय भासूं लागतात, म्हणून जी हल्लीं आपली समज आहे, तीच हजारों वर्षांपूर्वीं आमच्या पूर्वजांच्या देखील हृत्पटिकेवर पूर्णपणें खिळलेली होती, असें कोणाच्याही लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. परंतु, इतिहास

लिहिण्याची त्यावेळची पद्धति हल्लींच्या पद्धतीहून पुष्कळच भिन्न होती. त्यांत पुष्कळच फेरफार होण्याची अवश्यकता होती; आणि कल्पनाविषयास अजिबात टाळा देऊन, प्रत्येक घडलेल्या गोष्टीचा कालनिर्देश करणें अगदीं जरूरीचें होतें. शास्त्रीय विषयांत अशा प्रकारचा जो फेरबदल व्हावयाचा तो, अनुभवजन्य असल्यामुळें, एकदम कधींही होत नाहीं. तो कालांतरानेंच होत असतो. पाश्चात्यांच्या

पाश्चात्यांची इतिहास परिपक्कता.

इतिहास लेखनपद्धतींत हल्लीं जी परिपक्कता दृष्टीस पडते, ती आजकालच्या श्रमानें आलेली नव्हे. त्या कामांत त्यांचें सतत परिश्रम व दीर्घोद्योग असून, अनेक शतकें लोटल्यावर सांप्रतची परिपक्कता त्यास प्राप्त झाली आहे. आतां, ही इतिहासपरिपक्कता संस्कृत ग्रंथसमूहास

आम्हां पौरस्त्यांची तत्संबंधीं उणीव, व तिचीं कारणें.

देखील प्राप्त झाली असती. परंतु ज्या वेळेस आर्यबुद्धिमत्ता विकासाच्या शिखराप्रत जाऊन पोहोंचली होती, त्या वेळेस आर्यांच्या इतकें सुधारलेलें राष्ट्र व तत्सम बुद्धिवैभव असें पृथ्वीच्या पाठीवर अन्यत्र कोठेंही नसल्यामुळें, इतर राष्ट्रें त्यांस केवळ पामराप्रमाणें भासूं लागलीं. आणि त्या कारणानें त्यांच्यापासून आपणाला

1. "It may, however, be doubted, whether this

(पुढें चालू.)

ग्रहण करण्यासारिखें कांहींच नाहीं असें त्यांस वाटूं लागलें. त्यामुळें, परस्पर दळणवळणाचा प्रचार कमी होत चालला; व पृथ्वीपर्यटनाच्या योगानें जी भर ज्ञानांत पडावयाची ती न पडून, इतिहासाची शास्त्रीय विवेचन-पद्धति जेथल्या तेथें, व जशीच्या तशीच, कुंठित होऊन राहिली. तदनंतर कालवशात् यावनिक व म्लेच्छ स्वाऱ्यांची हिंदुस्थानावर एकामागून एक अशी गर्दी होऊन, भारतीयांच्या ज्ञानोदधीस पूर्ण ओहोटी लागली, ती अजूनपर्यंतही चांगलीशी फिरली नाहीं; इतकेंच नाहीं तर, त्या ऱ्हासावर्तांत आर्यसिंहशावक अगदींच हतवीर्य व नष्टवैभव होऊन गेले आहेत.

असो. तात्पर्य इतकेंच कीं, शास्त्रीय इतिहासाचा प्रवाह

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

early and independent civilization was not a misfortune to the Hindus; for, seeing themselves superior to all the tribes of whom they had knowledge, they learned to dispise the institutions of foreigners, and to revere their own, until they became incapable of receiving improvement from without, and averse to novelties even amongst themselves."

(Elphinston's History of India P. 95.)

संस्कृताशिवाय इतर भाषेंपील ऐतिहासिक बीजें, व इतिहास.

रुद्ध होण्यास सदरहू गोष्टी कारणीभूत होऊन, ह्या देशाची गुरुतर हानि झाली. तथापि, पूर्वीं दर्शविल्याप्रमाणें ऐतिहासिक सामग्रीची इकडे बिलकुल उणीव नाहीं. **संस्कृतां**त तर तत्संबंधीं अमूल्य **भांडार**च दृष्टीस पडतें. आणि थोड्याबहुत प्रमाणानें **फारसी, हिंदुस्थानी, मराठी**, वगैरे इतर भाषांतही तिची समृद्धि आहे. **महमद काशीम फेरिस्ता** नामक इतिहासकारानें **हिंदुस्थानांतील महमदीय** राजसत्तेचा इतिहास लिहून ठेविला असून, **ऐनी अकबरीं**त **अकबर** बादशाहाच्या कारकीर्दीतील इतिवृत्तांत आहे. तसेंच आमच्या **मराठी बखरीं**त **मराठी साम्राज्या**चा इतिहास अथपासून इतिपर्यंत लिहिलेला दृष्टीस पडत असून, त्या बखरी इतक्या मोठ्या आहेत कीं त्यांपैकीं प्रत्येक बखर **ग्रांटडफ**च्या **मराठ्यां**च्या इतिहासाएवढी होईल. **श्रीशिवछत्रपतीं**चें नामांकित चरित्र कोणीएक **कृष्णाजी अनंत सभासद** या नांवाच्या **ब्राह्मणानें** थोरले **राजाराम** नृपति यांच्या कारकीर्दींत लिहिलें असून, तो खुद्द **शिवाजीमहाराज छत्रपति**

1. "Upwards of one hundred of these manuscripts, some of them histories at least as voluminous as my whole work, were translated purposely for it."

(Grant Duff's. H. of the Marathas.)

यांच्याच पदरचा कारकून असल्यामुळें. त्यानें लिहिलेली हकीकत फारच विश्वसनीय आहे. चित्रगुप्तकृत बखर देखील फार जुनाट असून, त्याशिवाय आणखीही शिवाजी महाराजांच्या अनेक बखरी आहेत. पानिपतच्या कल्पान्तप्राय लढाईच्या देखील दोन बखरी आहेत. श्रीमंत भाऊसाहेब पेशवे यांची बखर तर प्रत्यक्ष त्यांच्याबरोबर लढाईत असणारानेंच लिहिलेली असल्यामुळें, तिचें ऐतिहासिक महत्व विशेष आहे. रघुनाथ यादवाची बखर देखील एका समानकालीनानेंच लिहून ठेविलेली आहे. श्रीशिवाजीछत्रपति, संभाजी, राजाराम, शाहू, रामराजा आणि धाकटा शाहू, इत्यादिकांचीं चरित्रें कोणीएक सातारकर चिटणीसानें लिहून ठेविलीं असून, ग्रंथ संख्येच्या संबंधानें ज्याप्रमाणें मोरोपंताची कविगणांत ख्याति आहे, त्याप्रमाणेंच बखरकारांत चिटणीस मजकूर यांची कीर्ति आहे; व त्यांत त्यांचा हात धरणारा दुसरा कोणीही नाहीं. होळकर व नागपूरकर भोंसले यांच्या इतिहासाविषयीं देखील निरनिराळ्या कैफीयती आहेत. पेशव्यांची बखर तर अमूल्यच ग्रंथ आहे. हींत पेशवाईच्या अव्वलीपासून अगदीं अखेरीपर्यंत साद्यन्त हकीकत दिलेली आहे. म्हणजे श्रीमंत बाळाजी विश्वनाथ भट पहिले पेशवे हे श्रीवर्धन येथून निघाल्यापासून तों तहत इंग्रज पुण्यांत येऊन ते शन-

वारच्या वाड्यावर आपला बावटा चढवीपर्यंतची हींत हकीकत आहे.

आतां, श्रीशिवाजी छत्रपतींनें मोठ्या पराक्रमानें व अतिसाहसानें हिंदुसाम्राज्य स्थापन केल्यानंतर, ज्या विक्रमशील पेशव्यांनीं सर्व हिंदुस्थानभर तें शुक्ल चंद्राप्रमाणें वृद्धीप्रत पोहोंचविलें, आणि ज्यांनीं थोडक्या मुदतींत मराठ्यांचा ( महाराष्ट्रीयांचा ) भगवा झेंडा हिमालयापासून तों तहत कन्याकुमारीपर्यंत मोठ्या बहाद्दुरीनें फडकाविला, त्यांच्या बखरीच्या मूल पीठिकेविषयीं जिज्ञासा व कुतूहल होणें अगदीं साहजीक आहे. सबब तत्संबंधीं दोन शब्द लिहितों. ही बखर वैजनाथ गांवीं रा. रा. कृष्णाजी विनायक सोहनी यानीं स्वमुखानेंच निवेदन केली असून, त्यांनीं तोंडीं सांगितलेली हकीकत तेथील लोकांपैकींच कांहींजणांनीं लिहून घेतली, व तिचा आदरपूर्वक संग्रह केला. कृष्णाजीपंत हे पेशवाईंत सुभेदारीच्या कामावर असून, ते मूळचे रत्नागिरीनजीक सोमेश्वर गांवचे राहणारे होत. परंतु काळेंकरून त्यांच्यावरही कालचक्रानें आपला पगडा बसवून त्यांच्या ऐश्वर्याची धूळधाण केली. तदनंतर त्यांनीं सर्व संसार सोडला, व आपल्या आयुष्याचा उत्तरार्ध वैजनाथ येथें नदीतीरीं, शिवाच्या देवालयांत ईश्वरोपासनेंत घालविला. पुढें त्यांचा काल त्यांच्या वयाच्या सत्तराव्या

वर्षी, इ० स० १८९४।९९ सालीं, त्याच देवालयांत झाला.

असो. एकंदरींत प्रस्तुत प्रसंगीं, जीं जीं साधनें ह्मणून आपणांस उपलब्ध आहेत, त्या सर्वांचा यथोचित उपयोग करून घेणें अगदीं अवश्य आहे.

आतां, **ऋग्वेद** हा अखिल पृथ्वीवरील अतिपुराण ऐतिहासिक ग्रंथ असल्याविषयीं, **पौरस्त्य** तथा **पाश्चात्य** सुजाण राष्ट्रें कबूल करतात. सबब **वेद**कालापासून पुढें कोठपर्यंत आपणांस ऐतिहासिक परंपरा मिळूं शकेल, तें पाहण्याविषयीं यत्न करूं.

---

# आर्यांचा वसतिप्रदेश.

वैदिक ऐतिहासिक स्थलें.

**कुभा** नदीपासून तों थेट **यमुना** नदीपर्यंत, आणि तिच्याही पलीकडे **गंगा** नदीपावेतों, तसेंच उत्तरेकडील **हिमालय** पर्वतापासून तों तहत **पश्चिमसमुद्रा**पर्यंतच्या प्रदेशांत **आर्यां**चें अधिनिवासस्थान असल्याचें **ऋगवेदां**तील **ऋचां**वरून चांगलें व्यक्त होतें. म्हणजे **उत्तर**-

१ तृष्टामया प्रथमं यातवे सजूः सुसर्त्वा रसयाश्वेत्याल्या ।
त्वं सिंधो कुभया गोमतीं क्रुमुं मेहत्न्वा सरथं याभिरीयसे ॥

( ऋ. अ. ३ व ७ मं. १० अ. ६ सू. ७५ )

( पुढें चालू. )

हिंदुस्थानच्या वायव्य कोंपऱ्यांत आमच्या वेदकालीन आर्यांची वस्ती असून, त्यांच्या वसतिप्रदेशाची मर्यादा वर दाखल

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालू.)

तात्पर्यार्थः—

हे **सिंधु** नदि, तूं प्रथम **तृष्टामा** नदीला मिळून, तदनंतर **सुसर्त**, **रसा**, **श्वेती**, **काबुलांतील कुभा**[2] नदी, **गोमती**[3], **मेहत्नु**, आणि **क्रुमु**[4], यांच्या सहवर्तमान प्रवास करतेस.

इमंमे गंगे यमुने सरस्वति शुतुद्रिस्तोमं सचता परुष्ण्या ।
असिक्न्या मरुद्वृधे वितस्तयार्जीकीये शृणुह्यासुषोमया ॥

(ऋ. अ. ३ व. ७ मं. १० अ. ६ सू. ७५)

तात्पर्यार्थः—

अहो **गंगा**, **यमुना**, **सरस्वति**, **शतुद्रि**[5] नद्यांनो, तुह्मी **परुष्णी**[6], **असिक्नी**[7], **मरुद्वृधा**, **वितस्ता**[8], **आर्जीकीया**[9], आणि **सुषोमा**[10], इत्यादि नद्यां सहित, माझ्या स्तुतिपाठाचा अंगिकार करा.

यस्येमे हिमवंतो[11] महित्वा यस्य समुद्ररसया सहाहुः ।
यस्येमाः प्रदिशो यस्य बाहू कस्मै देवाय हविषा विधेम ॥

(ऋ. अ. ७ व. ४ मं. १० अ. १० सू. १२१)

---

२ काबूल नदी. ३ गोमल नदी. ४ कुरम, ५ सतलज, ६ इरावती, म्हणजे रावी. ७ चीनाब, किंवा चंद्रभागा. ८ झेलम. ९ विपासा, किंवा बियाज. १० सिंधु. ११ हिमालयपर्वत.

केल्याप्रमाणें होती. कारण, जितका प्रदेश त्यांच्या पाहण्यांत किंवा अमलाखालीं होता, तितक्याच प्रांतांतील नद्या, पर्वत, आणि समुद्र यांचा त्यांनीं उल्लेख केलेला असल्याचें दिसतें. त्यांच्या पश्चिमेस **कूभा** व **सिंधुनदी**, आणि पश्चिम समुद्र होता. त्यांच्या उत्तरेस **हिमालय** पर्वत होता. आणि पूर्वेस **गंगा** नदी होती.

## आर्यांचें मूल.

आदिपुरुष मनु.

सर्व मनुष्यजातीचा **आदिपुरुष मनु** असल्याविषयीं, आमचे **वेदकालीन आर्य** देखील मानीत असत. आणि तत्संबंधीं उल्लेख **वेदांत** वारंवार येत असल्याचें दिसून येतें. **ऋग्वेदाच्या** एका ऋचेंत असें ह्मटलें आहे कीं, ‘ हे **अग्नि**, तूं **मनू**साठीं आकाशांतून गर्जना करविता झालास. ’ तसेंच, दुसऱ्या एके ठिकाणीं अशी प्रार्थना

---

१ मनुष्वदंग्ने अंगिरस्वदंगिरो ययातिवत्सदंने पूर्ववच्छुंचे ।
अच्छं याह्या वंहादैव्यं जनमा सादय बर्हिषि यक्षिं च प्रियम् ॥ १७ ॥
( अ. १. अ २. व ३५. मं १. अ ७. सू. ३१ ).

२ त्वमंग्ने मनंवे द्यामंवाशयः पुरूरवंसे सुकृते' सुकृत्तंरः ।
श्वात्रेण यत्पित्रोर्मुच्यंसे पर्यात्वा पूर्वं मन यन्नापरं पुनः ॥ ४ ॥
( अ० १. अ० २. व ३२. मं० १. अ० ७. सू. ३१ ).

केली आहे कीं, ' हे अग्नि, तूं मनूच्या घरीं येत होतास तसा, आमच्या घरीं ये, आणि सगळ्या देवांस प्रिय हवि अर्पण कर, ' इत्यादि.

**आदिमनु** हा जसा मूळ पुरुष **आर्यांचा**, तसा **आदम** हा मूळ पुरुष **यहुदि**, **ख्रिस्ती**, आणि **मुसलमान** लोकांचा होय. निःसंशय " आदिमनु " ह्याचाच " आदम " हा अपभ्रंश आहे. आणि **आर्येतरजनांनीं आदिमनूचा आदम** असा अपभ्रंश केला.

मनूपासून झालेलीं कुटुंबें.

असो. ह्या **मनू**पासून जीं अनेक कुटुंबें झालीं, त्या सर्वांत अतिप्राचीन म्हटलीं म्हणजे **अंगिरस**, **नवग्व**, **अथर्वण**, आणि **भृगु**, हीं होत. **ऋग्वेदाच्या** एका मंत्रांत असें म्हटलें आहे कीं, ' आमचे जे पितर प्राचीन पूर्वज, त्यांचा प्रसाद आम्हांवर असो. ' आणि ह्यांच मंत्रांत सदरहू पूर्वजांचीं नांवें दाखल केलीं आहेत.

**अंगिरस** कुळांतील मूळ पुरुष **अग्नि** असून, प्राचीन मानवी कुटुंबांचें धूरीणत्व त्याजकडेसच असल्यानें दिसतें. कारण, प्राणिमात्रांवर सत्ता चालवून त्याजवर अम्मल करण्यासाठीं, प्रथमतः **अग्निलाच** राजा बनविला असल्याचें

१ ऋ. १० १४. ६.

**अंगिरस** कुळांतील **हिरण्यस्तूप** ऋषी ह्मणतो. त्यावरून, मानवी स्थितीची सामाजिक व्यवस्था लावण्यासाठीं, तत्-कालीन **ऋषींनीं** अग्नीलाच प्रभुत्व दिलें होतें, असें अनु-मान करण्याला बलवत्तर कारण मिळतें.

आतां, **अग्नि** हा **अंगिरस** कुळाचा आदिपुरुष कसा होईल, असा प्रश्न उत्पन्न होण्याचा संभव आहे. परंतु, **हरिश्चंद्र, रामचंद्र,** इत्यादि असंख्य क्षत्रियांच्या वंशाचा जसा आदिपुरुष **सूर्य;** किंवा **पुरूरवा, युधिष्ठिर,** इत्या-दि अनेक क्षत्रियांचा मूळ पुरुष जसा **चंद्र;** त्याचप्रमाणें **अग्नि** हा **अंगिरसांचा** मूळपुरुष होय. कदाचित्, **सूर्य, चंद्र,** व **अग्नि,** ह्या नांवाचे विलक्षण, अद्वितीय, आणि तेजस्वी नरपुंगव त्या त्या कुळांत उदयास आल्या-वरून तीं तीं प्रकाशव्यंजक, व अतएव अन्वर्थ नांवें त्यांच्या वंशजांस पडलीं असावीं असें वाटतें.

आमच्या ज्या प्राचीन ऋषिवर्यांनीं **ऋग्वेद** संहितेचे

---

१ त्वामग्ने प्रथममायुमायवे देवा अकृण्वन्नहुषस्य विश्पतिम् ।
इळामकृण्वन्मनुषस्य शासनीं पितुर्यत्पुत्रो ममकस्य जायते ११
( अ. १. अ. २. व ३४ मं १. अ. ७. सू. ३१ ).

भावार्थः—

' हे अग्नि, जेव्हां माझ्या बापाला तूं पुत्र झालास, तेव्हां तुला देवांनीं मनुष्यरूपी मनुष्यांचा पहिलाच राजा बनविला, आणि इळेला त्यांची धर्मोपदेशकर्त्री केली. '

मंत्र रचिले व गाइले, त्यांचीं नांवें सर्वानुक्रमणिकेंत दिलीं आहेत, त्यावरून तत्संबंधीं तपशील ध्यानांत येईल.

---

# वेदकालीन समाजस्थिति.

---

वेदकालीं पृथक् पृथक् समाजाचे पृथक् पृथक् अधि-

---

१ वेदार्थयत्न, पुस्तक तिसरें, अंक १७, मासिक भाग ८७, फेब्रुवारी सन १८८० पहा, ( पान १ ते २२ ).

२ हीं नांवें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत:--

१ विश्वामित्राच्या कुलांतील मधुच्छंद. २ मधुच्छंदाचा पुत्र जेता ३ कण्व कुलोत्पन्न मेधातिथि. ४ अजीगर्ताचा मुलगा शुनःशेप, ह्यालाच विश्वामित्रानें दत्तक घेऊन देवरात हें त्याचें नांव ठेविलें. ५ आंगिरसकुळांतील हिरण्यस्तूप. ६ घोराचा पुत्र कण्व. ७ कण्वाचा पुत्र प्रस्कण्व. ८ अंगिरा ऋषीचा पुत्र सव्य. ९ गोतमकुलोत्पन्न नोधा. १० शक्तीचा पुत्र पराशर. ११ रहूगणनामक पुरुषाचा पुत्र गोतम. १२ आंगिरसकुळांतील कुत्स. १३ मरीची ऋषीचा पुत्र कश्यप. वृषागीर राजाचे पुत्र १४ ऋज्राश्व, १५ अंबरीष, १६ सहदेव, १७ भयमान, आणि १८ सुराधस्. १९ आप्त्य या उपनांवाचा त्रित नामक पुरुष अथवा कुत्स ( आंगिरस ). २० कक्षीवान्. २१ अंगदेशाच्या राजाच्या राणीची दासी उशिज् हिच्या पोटीं दीर्घतमसपासून झालेला कक्षीवान्. २२ भावयव्य राजा. २३ ( ह्या राजाची ब्रह्मवादिनी स्त्री ) रोमशा. २४ दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. २५ उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. २६ इंद्र. २७ मरुत्. २८ अगस्त्य. २९ लोपामुद्रा. इत्यादि

वेदकालीन समाज-स्थिति.

पति असून, त्यांच्यांत प्रसंगानुसार लढाया[1] देखील होत असत. क्वचित् प्रसंगीं हे प्रभु बलवान असल्यामुळें ते इतर मांडलिकांवर आपलें प्रभुत्व गाजवीत, व त्या कारणानें त्यांस सहजींच राजपद प्राप्त होऊन त्यांचा अम्मल[2] अनेक लोकांवर बसे.

आर्य व अनार्य.

त्यावेळीं आर्य लोक आपणांस अतिश्रेष्ठ मानीत असत. इतकेंच नाहीं तर, त्यांस आपणापेक्षां जे लोक अडाणी किंवा कर्महीन असत, ते अनार्य समजून त्याजला ते दस्यु ह्मणत. आणि आपणांस व त्यांस एकसारिखें न मानितां, त्यांत कांहीं भेद राखण्याविषयीं, ते देवतांची देखील प्रार्थना[3] करीत.

१ ऋग्वेद. म १. अ. १०. सू. ५३. मंत्र ९.

२ त्वमाविथ सुश्रवसं तवोति भिस्तव त्रामभिरिन्द्र तूर्वयाणम् ।
त्वमस्मै कुत्स मतिथिग्वमायुं महे राज्ञे यूने अरन्धनायः ॥१०॥
(अ १ अ. ४ व. १६. मं १ अ. १० सू. ५३).

अर्थ -

हे इंद्र, तू सुश्रवसास आणि तुर्वयाणास रक्षून, कुत्स, अतिथिग्व, व आयु, यास त्या मोठ्या तरुण राजाच्या हस्तगत करून दिलेंस.

३ विजानी ह्यार्यान्येच दस्यवो बर्हिष्मते रन्धया शासद व्रतान् ।

(पुढें चालू)

**दस्यु** ह्मणजे अव्रत किंवा कर्महीन लोक होत. हे भील खोंड, कोळी, कातकरी, महार, वगैरे रानटी जातींचे व धर्मरहित असून, ते आमच्या पूर्वज **आर्यांस** नेहमीं त्रास देत, आणि त्यांच्या यज्ञयागादि धर्मकृत्यांत वारंवार अडथळा करीत.

**आर्य** हे मुळपासूनच धार्मीक वृत्तीचे असून, ते प्रत्यही यज्ञ करीत. सवत्र त्यांस बर्हिष्मत्, सुन्वत्, देवयु, यज्वन, अशीं नांवें, ह्मणजे यज्ञ करणारे, सोम काढणारे, देवांची वांछा करणारे, यजन करणारे, इत्यादि विशेषणें दिलेलीं आढळतात.

वेदकालीं ब्राह्मण क्षत्रियादि वर्णांची रचना.

**वेदकालीं** हल्लींप्रमाणेंच **ब्राह्मण, क्षत्रियादि** वर्णव्यवस्था असावी असें अनुमान होतें. कारण, एका §मंत्रांत पहिल्या दोन्ही वर्णांचा उल्लेख केला असून, †दुसऱ्या एका मंत्रांत **पंचजनांचें** कथन आहे.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

शाकी भव यजमानस्य चोदिता विश्वेत्ताते सधमादेषु चाकन॥ ८॥

( मं १. अ १०. सू ५१ ).

भावार्थः-

हे इंद्रा, आर्य कोण आणि दस्यु कोण यांत तूं भेद कर, आणि कर्म-

( पुढें चालू. ) ( § † पुढील पृष्ठावर पहा. )

आतां, कदाचित् ब्रह्मकर्म जाणणारे, किंवा ईश्वरोपासना करणारे, अथवा वेद मंत्र रचणारे ते **ब्राह्मण;** किंबहुना पारमार्थिक विषयांत जे निपुण ते **ब्राम्हण,** आणि राजकारणांत जे कुशल ते क्षत्रिय किंवा **राजे,** अशा अर्थानेंच सदहू दोन्ही शब्दांची योजना झाली असावी.

विद्वन्मणि राव बहादुर **शंकर पांडुरंग पंडित** यांचें

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

हीन दस्यूंचें शासन करून, तूं त्यांजला ईश्वरपरायण आर्यांच्या हस्तगत कर.

§ यदिन्द्राग्नी मदथः स्वे दुरोणे यद्ब्रह्मणि राजनी वा यजत्रा ।

अतः परि वृषणा वा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥७॥

(अ १. अ ७ व २७. मं १ अ. १६. सू. १०८ ).

भावार्थः-

हे इन्द्राग्नीहो, तुम्ही जरी आपल्या घरीं आनंद करीत असला, किंवा ब्राह्मणाच्या अथवा राजाच्या येथें आनंदांत असला, तथापि तिकडून या आणि हा सिद्ध केलेला सोमरस प्या.

। अदितिर्द्यौरदितिरंतरिक्षमदितिर्माता सपिता सपुत्रः ।

विश्वे देवा अदितिः पंचजना अदितिर्जातमदितिर्जनित्वम् १०

(अ. १. अ. ६. व १६. मं १. अ. १४ सू. ८९ ).

भावार्थः-

हे अदिती तुम्हीच द्युलोक, अंतरिक्ष, माता, पिता पुत्र, विश्वदेव, पंचजन, जात पदार्थ आणि भविष्य पदार्थ आहांत.

असें मत आहे कीं, केवळ **ब्राह्मण** कुलांत जन्म घेतल्यानेंच **ब्राह्मण**, किंवा राजकुलांत जन्म घेतल्यानेंच **राजा** ( क्षत्रिय ), ( मग तो खरोखर ब्रह्मकर्म जाणीत असो, किंवा राज्य करीत असो, वा नसो ), असा अर्थ **ब्रह्मा** ( ब्राह्मण ) आणि **राजा** (क्षत्रिय) ह्या शब्दांचा **वेदांत** होत नाहीं. जो खरोखर राज्य करीत नसेल, तो राजकुलांत जन्मला असला तथापि त्याला राजा ही संज्ञा प्राप्त होत नाहीं.

**पंचजना**चा शब्दशः अर्थ म्हटला म्हणजे पांच प्रकारचे लोक, असा होतो. आणि **ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र**, इत्यादि चार वर्ण, व **निषाद** म्हणजे पारधी, कोळी. इत्यादिकांचा पांचवा वर्ण, मिळून पांच प्रकारचे जे लोक, ते **पंचजन**[2] असें **सायणाचार्य** म्हणतात.

---

१ वेदार्थयत्न. पुस्तक २ रें, अंक १२ वा, मासिक भाग २६ पहा ( मे १८७८. पा. ७२५. )

२ ऋ. १. १७६. ३ याच्या भाष्यावर लिहीत असतां, पंचजनाचा अर्थ देव, मनुष्य, पितर, पशु, आणि पक्षी इत्यादि होत असल्याविषयीं, सायणाचार्य म्हणतात. परंतु अन्वय आणि अर्थसंदर्भ यांस अनुसरून, केव्हां केव्हां पांच प्रकारचे मनुष्य लोक, ह्मणजे पांच जातींचे अथवा वर्णांचे लोक असा, आणि केव्हां केव्हां देव, गंधर्व, पितर, असुर, व राक्षस, किंवा इतर देवगणांपैकीं पांच प्रकारचे लोक, असा अर्थ मानून निर्वाह केला पाहिजे, असें रा. ब. शं. पां. पंडित यांचें म्हणणें आहे. ( वेदार्थयत्न. पु २. अं. ७ पा. ४०८. )

तथापि, पुरुषसूक्तांत तर ह्या वर्णव्यवस्थेविषयीं, स्पष्टच उल्लेख आहे. कारण, त्यांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं,

ब्राह्मणोऽस्य मुखं मासीद्
बाहू राजन्यः कृतः।
ऊरू तदस्य यद्वैश्यः
पद्भ्यां शूद्रोऽअजायत ॥

(ऋ. अ. ८ मं. १० अ. ७)

विश्वात्याचे ब्राह्मण हे मुख असून, क्षत्रिय हे त्याचे बाहू होत. तसेंच, वैश्य त्याच्या मांड्या असून, शूद्र त्याच्या पायांपासून जन्मले आहेत. आतां, हे ऋग्वेदांतीलच सूक्त असल्यामुळें त्याच्या पौराणत्वाविषयीं जास्त सांगावयास नलगे. ह्या ऋचेवरून पूर्वीपासूनच वर्णव्यवस्था सूरू असल्याचें दिसतें.

वर्ण व्यवस्थेचें इंगित.

आतां, ही वर्णव्यवस्था केवळ धंदेवारीच्या संबंधानेंच झाली असल्याचें दिसतें. आणि ब्रम्हकर्म जाणणारे, अथवा पारमार्थिक विषयांत जे निपुण, ते ब्राम्हण; क्षात्रिय धर्म पाळणारे, किंवा राजकारणांत जे कुशल, ते क्षात्रिय; व्यापार, शेतीभाती, व गुरेंढोरें, इत्यादि कर्मांत

जे दक्ष, ते वैश्य; आणि ज्यांस सदरहूपैकीं एका गोष्टीचेंही ज्ञान नसून, जे केवळ सेवा करण्यास मात्र योग्य, ते शूद्र; याप्रमाणें, सामाजिक व्यवस्थेच्या सोईसाठींच हें समाजबंधन लावून दिलें असावें, असें वाटतें. व ह्याच कारणामुळें, त्यावेळीं आपापसांत रोटीव्यवहाराची आणि बेटीव्यवहाराची कांहींच हरकत नव्हती. आणि अन्यवर्णांतील धंदा अथवा उद्योग करण्याचें ज्यांच्यांत सामर्थ्य येई, ते सुखेनैव त्या त्या वर्णांत जात.

आपापल्या गुणप्रभावानें व तेजानें, वैश्य हे क्षत्रिय होत, आणि क्षत्रिय हे ब्राम्हण बनत. इतकेंच नाहीं तर, वेदकाळीं एकमेकांचा अन्यवर्णाशीं हमखास लग्नव्यवहार होई, आणि अन्नव्यवहारही चाले. याविषयीं सविस्तर विवेचन मागें केलें आहे, आणि तत्संबंधीं तपशिलवार उदाहरणें देखील अकराव्या भागांत ४९।५० पानांवर सांगितलीं आहेत.

वर्णांतर, व आपापसांत रोटी आणि बेटी व्यवहार.

---

# आत्मोन्नति
## व
## सन्मार्गाविषयीं आर्यांची प्रवृत्ति.

नीतिमार्ग, ईशसेवा, व अध्यात्मविद्या, यांविषयीं

आर्यांची नीति व आत्मोन्नति.

आमचे पूर्वज प्रथम पासूनच फार दक्ष असल्याचें दिसतें. सन्मार्ग दाखवून असन्मार्गापासून निवृत्त होण्याविषयीं देवांचें स्तवन, त्यांनीं एका मंत्रांत केलें आहे. तसेंच, आपण आपल्या उत्कर्षाच्या वेळीं, किंवा ऐश्वर्याच्या भरांत निमग्न होऊन देवांस न विसरतां, सुखाच्या वेळीं सुद्धां त्यांची सेवा करण्याची आपणांस इच्छा राहो, अशी दुसऱ्या एका मंत्रांत त्यांनीं प्रार्थना केली आहे. अशा प्रकारची लालसा होणें ह्मणजे धर्मज्ञानाचा खरोखर कळस होय, असें कोणत्याही विचारी पुरुषास वाटल्यावांचून राहणार नाहीं.

---

१ ऋजुनीतीनो वरुणो मित्रो नयतु विद्वान् ।
अर्यमा देवैः संजोषाः ॥ १ ॥
(अ. १. अ. ६. व १७. मं १. अ. १४ सू. ९० ॥

भावार्थः--
सर्वज्ञ असे जे वरुण व मित्र आणि अर्यमा, हे इतर देवांसहित आम्हाला सरळ नीतीचा मार्ग दाखवोत.

२ यउदृचीन्द्र देवगोपाः सखायस्ते शिवतमा असाम ।
त्वां स्तोषामत्वया सुवीरा द्राघीय आयुः प्रतरं दधानाः ११ । १६
(अ. १ अ. ४ व १६. मं. १ अ १० सू. ५३ ).

भावार्थः—
हे इंद्रा, यज्ञसमाप्तीपर्यंत आह्मास साहाय्य देऊन देवांनीं आमचें रक्षण केलें.

आतां वेदकालीं, समाजाच्या बाल्यावस्थेत, धर्माची प्रथमची पर्याप्ति कोठपावेतों होती याविषयीं ऋग्वेदांनेंच सूक्ष्मावलोकन केलें तर असें दिसून येईल कीं, त्यावेळीं एकादा बैल शिजवून तो देवाला अर्पण करणें, यालाच धर्म ह्मणत. तदनंतर सोम अर्पण करणें, किंवा स्तोत्रें म्हणणें, इत्यादि धर्म मागाहून प्रचारांत आले.

तथापि, धर्म विषयांत आमच्या आर्यांचें पाऊल नित्यशः पुढेंच पडत गेलें. कारण, त्या बाबतींत त्यांनीं सर्व प्रकारें फार दूरवर, व गहन, विचार केला होता. त्यामुळें त्यांच्या मनाची प्रगल्भता होऊन, त्यायोगें पूर्ण रीतीनें साहजीकच चित्तविकास झाला.

ऋग्वेदांतील १६४वें सूक्त फारच महत्वाचें व मोठें चमत्कारिक आहे. ह्या सूक्तांत स्तवनाचा अंश अगदीं थोडा असून, त्यांत ज्ञान, मोक्ष, आणि ब्रह्म, यांची

१ शकमयं धूममारादपश्यं विषूवता पर एनावरेण ।
उक्षाणं पृश्निमपचंत निरास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ॥ ४३ ॥
( अ. २ अ. ३ व २२. मं. १ अ. २२ सु. १६४ )

भावार्थः—

मी गोवरीचा धूर दुरून पाहिला. त्यांत अग्नि असून, त्यायोगें चित्रविचित्र बैलाला शूर पुरुष शिजवीत असत. आणि त्याचा हविर्भाग देवांस अर्पण करीत. हाच प्रथमावस्थेंतील धर्म होय.

प्रशंसा आहे. ह्या सूक्तांतील मंत्रांचा अर्थ फारच गूढ आहे, व तो बहुतकरून अध्यात्मपर आहे. एका ऋचेंत पृथिवीची शेवट सीमा कोणती, जगाचें मध्य कोणतें, आणि वाचेचें अत्युच्च स्थान कोठें आहे, तें विचारिलें आहे. दुसऱ्या एका ऋचेंत असें म्हटलें आहे कीं, आत्मा हा सर्वांस ठाऊक आहे तरी त्याचें खरें स्वरूप कोणीही जाणत नाहीं. आत्मा स्वतः अमर असतांही तो नष्ट होणाऱ्या देहांत वास करतो. तो स्वतः दृष्टीस पडत नसतांही केवळ शरीर हालचाल करतें, ह्मणून भासमान होतो. आत्म्याचा केव्हां केव्हां उत्कर्ष व अपकर्ष होत असतो. देहाचा व आत्म्याचा संबंध नित्य आहे. तथापि, पहिला अनित्य व दुसरा नित्य असून, देह दृष्टिगोचर आहे व आत्मा अदृष्ट आहे. जो

---

१ पृच्छामित्वा परमंतं पृथिव्याः पृच्छामि यत्र भुवनस्य नाभिः।
पृच्छामित्वा वृष्णो अश्वस्यरेतः पृच्छामि वाचः परमं व्योम ३४

(अ. २. अ. ३. व २०. मं. १. अ. २२. सू १६४).

२ न विजानामि इत्यादि. ॥ ३७ ॥ सदर.

३ अपाङ्‌ प्राङेति स्वधया गृभीतोऽमर्त्यो मर्त्येना सयोनिः।
ताशश्वंता विषूचीना वियन्तायन्यं चिक्युर्न नि चिक्युरन्यम् ३८

(अ. २. अ. ३. व २१. मं १ अ० २२. सू. १६४).

स्वतः अस्थिमांसाशिवाय असतांही अस्थिमांसाचे प्राणी उत्पन्न करितो. तोच ईश्वर असून, पृथिवीवरील सर्व सृष्ट पदार्थ त्यानेंच उत्पन्न केले आहेत. आणि मृष्टपदार्थांचा प्राण, रक्त, आणि आत्मा, इत्यादि त्यावेळीं कोठें होते, हें फक्त त्यासच माहीत आहे, वगैरे नानाविध गहन विषयांचें विवेचन ह्या सूक्तांतच केलेलें आढळतें.

वेदांत, ह्मणजे ऋग्वेद संहितेंत, अनेक देवांची भक्ति व स्तुति केली असल्याचें दृष्टीस पडतें. तथापि, हें जें विचित्र आणि प्रचंड विराट् स्वरूप भासमान होतें, तें त्या एकच परमेश्वराची विभुति आहे, असें आमचे जगद्वंद्य पूर्वज पूर्णपणें जाणून होते. व प्रसंगानुसार ते भिन्न भिन्न विभुतींचें स्मरण करून, तिजला ते भिन्न भिन्न नावें देत; आणि तीच पृथक् पृथक् कार्याची पृथक् पृथक् देवता समजून, त्या प्रत्येक देवतेचा ते निरनिराळा स्तुतिपाठ गात.

एका मंत्रांत असें म्हटलें आहे कीं, ह्या त्रैलोक्यांतील चालक वस्तु एकच असून, तिलाच कोणी इंद्र, कोणी मरुत्, कोणी मित्र, कोणी वरुण, कोणी अग्नि, व कोणी द्युलोकींचा पक्षी असें म्हणतात. आणि कांहीं कांहीं

---

१ कोददर्श प्रथमं जायमानमस्थन्वंतं यदनस्था बिभर्ति ।
भूम्या असुरसृगात्मा क्व स्वित्को विद्वांसमुप गात्प्रष्टुमेतत् ॥४॥
(अ २. अ ३. व १४. मं १ अ. २२. सू. १६४).

ऋषी त्याच वस्तूला यम, मातरिश्वा, इत्यादि अनेक नांवें देतात. ह्यावरून इतकें कोणाच्याही लक्षांत येईल कीं, हिंदुलोक जरी अनेक देवास भजतात, तरी ह्या जगाचा नियंता एकच असून, त्याचींच हीं नानाविध रूपें, व भिन्न भिन्न नामधेयें आहेत, असें ते पक्केपणीं समजून आहेत. आणि ह्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे ऋग्वेदांतील प्रस्तुतचा मंत्र फारच महत्वाचा आहे.

आतां, ऋगवेदाचा काल पूर्वी सांगितलाच आहे, सबब तत्संबंधीं पुनरुक्ति न करितां, पुढील विषयाकडे वळूं. ह्या भरतखंडांत पराक्रमी आणि बलवान राजांची जी परंपरा होऊन गेली, ती सूर्य व चंद्र या नांवानें सुप्रसिद्ध आहे. एकींतील राजांस सूर्यवंशीय असा किताब असून, दुसरीस चंद्रवंशीय ह्मणतात. त्या प्रत्येकींत अनेक बलाढ्य व सद्गुणी राजे होऊन गेले, व त्यांची कीर्ति देखील अजरामर राहिली.

---

१ इंद्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्॥ एकं सद्विप्रा बहुधा वदंत्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः॥४६॥२२॥

(अ. २. अ. ३. व २२. मं २२. सू. १६४).

२ इ. स. पूर्वी आठ दहा हजार वर्षे. भाग १३ वा, पान ८६ पासून ९० पर्यंत पहा.

# भाग १७ वा.

## उत्तर हिंदुस्थानांतील

प्राचीन

# नृपावलि.

### सूर्यवंशी राजे.

सूर्यवंशी राजे.

सूर्यवंशांतील राजांची रामचंद्रापर्यंतची नामावलि वाल्मीकि रामायणांत दिली आहे, तिजवरून त्यांची मूळपीठिका सहजीं लक्षांत येण्यासारखी आहे. करनल टॉड्नें देखील सूर्यवंशी राजांची वंशावलि दिली आहे. पण तींत आणि हींत

१ सर्वं सलिलमेवासीत् पृथिवी तत्र निर्मिता ।
ततः समभवद्ब्रह्मा स्वयंभूर्दैवतैः सह ॥ ३ ॥
स वराहस्ततो भूत्वा प्रोज्जहार वसुंधराम् ।
असृजच्च जगत् सर्वं सहपुत्रैः कृतात्मभिः ॥ ४ ॥
आकाशप्रभवो ब्रह्मा शाश्वतो नित्य अव्ययः ।

( पुढें चालू )

केत्येक ठिकाणीं फरक दिसतो. शास्त्रीय ऐतिहासिक ग्रं-
थांची इकडे मूळपासूनच उणीव असल्या कारणानें, पौरा

( मागील पृष्ठावरून पुढे चालू )

तस्मान्मरीचिः संजज्ञे मरीचेः कश्यपः सुतः ॥ ५ ॥
विवस्वान् कश्यपाज्जज्ञे मनुर्वैवस्वतः स्वयम् ।
स्वयंमतु प्रजापतिः पूर्वमिक्ष्वाकुस्तुमनोः सुतः ॥ ६ ॥
यस्येयं प्रथमं दत्तामसमृद्धा मनुनामही ।
तमिक्ष्वाकुमयोध्यायां राजानं विद्धिपूर्वकम् ॥ ७ ॥
इक्ष्वाकोस्तु सुतः श्रीमान् कुक्षिरित्येव विश्रुतः ।
कुक्षेरथात्मजोवीर विकुक्षिरुपपद्यत ॥ ८ ॥
विकुक्षेस्तु महातेजा बाणः पुत्रः प्रतापवान् ।
बाणस्य च महाबाहु रनरण्यो महातपाः ॥ ९ ॥
नानावृष्टिर्बभूवास्मिन्न दुर्भिक्षः सतांवरे ।
अनरण्ये महाराजे तस्करोवापि कश्चन ॥ १० ॥
अनरण्यान्महाराज पृथूराजा बभुवह ।
तस्मात्पृथोर्महातेजा त्रिशंकु रुदपद्यत ॥ ११ ॥
ससत्यवचनाद्वीरः सशरीरो दिवंगतः ।
त्रिशंकोरभवत्सूनुर्धुंधुमारो महायशाः ॥ १२ ॥
धुंधुमारान्महातेजा युवानाश्वोव्यजायत ।
युवनाश्व सुतः श्रीमान्मांधाता समपद्यत ॥ १३ ॥
मांधातुस्तु महातेजाः सुसंधिरुप पद्यत ।
सुसंधेरपि पुत्रौद्वौ ध्रुवसंधिः प्रसेनजित् ॥ १४ ॥
यशस्वी ध्रुवसंधेस्तु भरतो रिपुसूदनः ।
भरतात्तु महाबाहो रसितोनाम जायत ॥ १५ ॥
यस्यैते प्रतिराजान उदपद्यंत शत्रवः ।
हैहयास्तालजंघाश्च शुराश्च शशबिन्दवः ॥ १६ ॥

( पुढें चालू )

णिक व इतर अर्धैतिहासिक ग्रंथांत थोडाबहुत फरक असण्याचा विशेष संभव आहे. सबब मिळण्यासारखी

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

तान्स्तुसर्वान्प्रति व्यूह्य वृद्धेराजा प्रवासितः ।
सचशैलवरे रम्ये बभूवाभिरतो मुनिः ॥ १७ ॥
द्वेचास्य भार्येगर्भिण्यौ बभूवतु रितिश्रुतिः ।
तत्रचैकामहाभागा भार्गवं देववर्चसम् ॥ १८ ॥
ववंदे पद्मपत्राक्षी कांक्षिणी पुत्रमुत्तमम् ।
एकागर्भ विनाशाय सपत्न्यै गरलंददौ ॥ १९ ॥
× × × ॥ २० ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥
सपत्न्यानुगरस्तस्यै दत्तोगर्भ जिघांसया ।
गरेण सहतेनैव तस्मात्स सगरोभवत् ॥ २४ ॥ × ॥ २५ ॥
असमंजस्तु पुत्रोभूत्सगरस्येतिनः श्रुतम् ।
जीवन्नेव सपित्रातु निरस्तः पापकर्मकृत् ॥ २६ ॥
अंशुमानपि पुत्रोभूदसमंजस्य वीर्यवान् ।
दिलीपोंशुमतः पुत्रो दिलीपस्य भगीरथः ॥ २७ ॥
भगीरथात्ककुत्स्थश्च काकुत्स्थायेनतुस्मृताः ।
काकुत्स्थस्यतु पुत्रोभूद् रघुर्येनतुराघवा ॥ २८ ॥
रघोस्तु पुत्रस्तेजस्वीप्रवृद्धः पुरुषादकः ।
कल्माषपादः सौदासइत्येवं प्रथितो भुवि ॥ २९ ॥
कल्माषपादपुत्रोभूच्छंखणस्त्वितिनः श्रुतम् ।
यस्तुनर्द्धार्यमासाद्य सहसैन्यो व्यनीनशत् ॥ ३० ॥
शंखणस्य तु पुत्रोभूच्छूरः श्रीमान् सुदर्शनः ।
सुदर्शनस्याग्निवर्ण अग्निवर्णस्य शीघ्रगः ॥ ३१ ॥
शीघ्रगस्य मरुः पुत्रो मरोः पुत्रः प्रशश्रुवः ।
प्रशुश्रुवस्य पुत्रोभू दंबरीषो महामतिः ॥ ३२ ॥

( पुढें चालू )

उपयुक्त तेवढीच माहिती मिळवून, ती वाचकांपुढें सादर करण्याचा प्रयत्न केला आहे.

**रामायणावरून** पाहतां, **मनूपासून रामचंद्रापर्यंत** पस्तीस राजे होऊन गेल्याचें समजतें. परंतु करनल **टॉड्नें** जी वंशावलि दिली आहे, तिजवरून पाहतां ह्या राजांची संख्या एकुणसाठ असल्याचें दिसतें.

**लव** हा **रामाचा** ज्येष्ट पुत्र असून, **सुमित्र** हा पुराणांतरीं वर्णन केलेला **सुर्यवंशांतील** शेवटला राजा होय. आतां, **लवापासून** सुमित्रापर्यंत छप्पन्न राजे होऊन गेले. आणि प्रसिद्ध **विक्रमादित्य**[1] उदयास येण्यापुर्वी कांहीं काल सदरहू **सुमित्राची** कारकीर्द असावी, असें करनल् **टॉड्** लिहितात. **सुमित्रा** नंतरचे जे त्याचे वंशज, तेच अर्वाचीन काळचे **रजपूत** राजे होत.

सदरीं लिहिलेल्या प्राचीन काळच्या प्रत्येक राजाच्या

( मागील पृष्टावरून पुढें चालू )

अंबरीषस्य पुत्रोभून्नहुषः सत्यविक्रमः ।
नहुषस्यच नाभागः पुत्रः परमधार्मिकः ॥ ३३ ॥
अजश्च सुव्रतश्चैव नाभागस्य सुतावुभौ ।
अजस्यचैव धर्मात्मा राजादशरथः सुतः ॥ ३४ ॥
तस्यज्येष्ठोसिदायादो रामइत्यभि विश्रुतः ।
तद्गृहाणस्वकं राज्यमवेक्षस्व जगन्नृप ॥ ३५ ॥

(वाल्मीकि रामायण. अयोध्याकांड. २.)
(सर्ग ११०. पोथी पान १७९–१८०.)

१ ह्या चक्रवर्ती राजाचा शक, इ. स. पूर्वी ५६ वर्षे होय.

त्यांचा काल. कारकीर्दीचा काल ठरविण्याचें काम फारच अवघड आणि जोखिमीचें आहे. कारण, तो निर्वेधपणें निश्चित करण्याचें खात्रीपूर्वक साधन बिलकूल उपलब्ध नाहीं. तेव्हां, अशा स्थितींत कांहीं तरी कल्पना करून प्रत्येक कारकीर्दीला वर्षांची मनसोक्त फाळणी करून देणें अगदीं अविचाराचें होईल, असें जाणून तें काम हातीं धरलें नाहीं. तथापि, त्यांच्या राजधानीचें ठिकाण, आणि त्यांचा आनुमानिक काल देणें अगदीं अवश्य असल्यामुळें, तो येथें देतों.

**सूर्यवंशी** राजे **अयोध्या** नगरीं राज्य करीत असून, त्यांचा काल इसवी सनापूर्वी ३५०० वर्षें, किंबहुना चार हजार वर्षेंही असावा, असें कांहीं पुराव्यावरून व प्रमाणांवरून कळून येतें. आतां, हा काल जरी अगदीं अबाधित किंवा निश्चित नाहीं, तथापि त्यावरून जवळ जवळचें असें खात्रीपूर्वक अनुमान करण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं.

सांप्रतचीं **रजपूत** राजघराणीं आपली कुलपरंपरा **रामचंद्राचे** जे पुत्रद्वय **लव** आणि **कुश** यांजपासूनच आली असल्याचें सांगतात. **मेवाड, जयपूर, मारवाड, बिकानेर,** इत्यादि प्रांताचे **रजपूतराजे सूर्यवंशीय** होत. **रामाचा** वडील मुलगा

1. These lists, according to Sir W. Jones would carry us back to 3500 years before Christ."

(Elphinstone's India). P 265.

लव, याजपासून **मेवाडचे** राणे आपली कुलोत्पत्ति असल्याचें दर्शवितात; आणि त्याचा धाकटा भाऊ जो **कुश** त्याजपासून **मारवाड, निरवाड, अंबर,** वगैरे देशांतलीं राजघराणीं उद्भवलीं असल्याचें कळतें. **भगवत्** पुराणांत जें सूर्यवंशीय राजांचें वर्णन आहे त्यांत **सुमित्र** हा शेवटला असून, तो **लवाच्या** पिढीपैकीं आहे. व ह्या **सुमित्रापासूनच** सांप्रतच्या **मेवाडच्या** राजांचा वंश सुरू झाला.

---

## चंद्रवंशी राजे.

चंद्रवंशी राजे.

हे राजे **गंगा** आणि **यमुना** या नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत राज्य करीत असून, त्यांची राजधानी **इंद्रप्रस्थ** व **हस्तिनापुर** येथें असे. **युधिष्ठिराची** राजधानी इंद्रप्रस्थ किंवा **दिल्ली** येथें होती, व **दुर्योधनाची** हस्थिनापुरास होती.

---

१ इंद्रप्रस्थ येथें असलेला, पांडवांच्या दिग्विजयाचा लोहस्तंभ किती खोल आहे, हें पाहण्यासाठीं एका पायंढानें तो हालवून "ढिला" केला. त्यामुळें ती जागा "ढिली" झाली. आणि ह्मणूनच या ढिल्या झालेल्या जागेस दिल्ली असें नांव पडल्याचें सांगतात.

( टॉड्कृत राजस्थानचा इतिहास. )
पान २९ पहा.

बुद्धापासून[1] युधिष्ठिरापर्यंत शेचाळीस राजे होऊन गेले असून, युधिष्ठिरापासून पृथिवीराजापर्यंत शंभर राजे झाले; व हा पृथ्वी राजा संवत १२१५ सालीं, ह्मणजे इ० स० ११५९ त जन्मला होता. युधिष्ठिरामागें त्याचा नातू, ह्मणजे अर्जुनाचा मुलगा जो अभिमन्यु त्याचा पुत्र परिक्षित्, हा गादीवर बसला; आणि तदनंतर राजपालपर्यंत सहासष्ट राजे होऊन गेले. ह्याच राजपाल राजास विक्रमादित्यानें पदच्युत करून, दिल्ली शहर त्यानें आपल्या हस्तगत केलें, व पुढें बादशाही राजधानीचें ठिकाण त्यानें तेथून मोडून ते अवंतीसच नेलें. ह्या दिग्विजयी विक्रमादित्याचा शक, इ० पूर्वी ५६ व्या वर्षी सुरू झाला.

त्यांचा काल.

राजपाल पदभ्रष्ट झाल्याकारणानें इंद्रप्रस्थ येथील राजधानीचें ठिकाण जें एकदां मोडलें, तें त्या गतवैभवस्थितींत सुमारें आठशें वर्षे राहिलें. तदनंतर पांडव घराण्यांपैकीं तुवार जातींतील अनंगपाल राजानें पुनश्च त्या ठिकाणीं आपली राजधानी स्थापन केली. आणि तेव्हांपासून त्या राजधानीचें पूर्वीचें इंद्रप्रस्थ हें नांव जाऊन, दिल्ली असें नूतन नांव पडलें. अनंगपाळानंतर पृथिवीराज हा दिल्लीच्या गादीवर बसला. परंतु गृहकलहामुळें

१ हा गौतम बुद्ध नव्हे.

रण माजून शाहाबुद्दीन गिझनीबरोबर लढत असतां तो पकडला गेला आणि पदच्युत झाला. ( इ० स० ११९४. )

चंद्रवंशांतील कांहीं राजांचा काल बाह्य पुराव्यावरून आपणांस अगदीं खात्रीपूर्वक कळून येतो. त्यामुळें ऐतिहासिक अशा मजबूत पायावर आपला प्रवेश होऊन, सर्व गोष्टींची सुसंगति, व योग्य व्यवस्था, आणि चांगला मेळ लागतो.

आतां, **युद्धिष्ठिराचा** काल कोणता हें थोडक्यांत सांगून, तदनंतरच्या ज्या ज्या राजांच्या कालाचा बाह्य पुराव्याशीं मुकाबिला मिळतो, त्या विषयींचें यथावकाश दिग्दर्शन करूं.

**महाभारत** युद्ध इसवी सनापूर्वी २८९६ वर्षें झालें असल्याचें, **राजतरंगिणीवरून** कळून येतें. कारण, तींत असें लिहिलें आहे कीं, **युद्धिष्ठिर** आपल्या राज्यांत पुनश्च स्वस्थानापन्न झाल्यावर त्यानें आपल्या नांवाचा नवीन शक सुरू केला, आणि **अर्जुनाचा** नातू जो **परिक्षित्** याजला सिंहासनारूढ करून, **कृष्ण** आणि **बलदेव**-सह आपण **द्वारिकेस** गेला. सदरहू युद्ध व हा ( **राजतरंगिणींतला** ) लेख यांच्या दरम्यान ४६३६ वर्षें गेलीं आहेत.

**युद्धिष्ठिर** राजा सार्वभौम असून, त्यानें आपल्या बंधूंच्या साहाय्यानें सर्व राजांस व राष्ट्रांस पादाक्रांत

---

१ राजतरंगिणीचा लेखनकाल, इसवी सनाचें १७४० वें वर्ष होय.

करून, त्यांस करभार द्यावयास लाविलें, आणि ह्मणूनच त्यानें आपल्या नांवाचा नूतन शक स्थापित केला.

महाभारत युद्ध कधीं झालें, याविषयीं बराच मतभेद असल्याचें दिसतें. इवल्ली येथें मिळालेल्या शिलार्पित लेखावरून, तें इ० स० पूर्वी ३६०० वर्षापलीकडील कालांत होऊन गेल्याचें होतें. राजतरंगिणीवरून तें इ० स० पूर्वी २८०० वर्षा पलीकडील कालांत झाल्याचें दिसतें. एलफिन्स्टन् इतिहासकाराचें असें ह्मणणें आहे कीं, तें इ० स० पूर्वी १४५० व्या वर्षी, अथवा ग्रीस देशांतील सुप्रसिद्ध ट्रोजन्-युद्ध होण्यापूर्वी दोनशें वर्षें, झालें असावें. डाक्तर हंटरचा असा अभिप्राय आहे कीं, तें इ० स० पूर्वी १२ व्या शतकांत होऊन गेलें असावें. आणि करनल् टॉड् असें लिहितात कीं, तें इ० स० पूर्वी ११७९ वर्षाच्या सुमारास झालें असावें. हा इतका फरक पडण्याचें कारण असें दिसतें कीं, युरोपस्थ इतिहासकार प्रत्येक राजाच्या कारकीर्दीचा काल सरासरीच्या मानानें फक्त एकोणीस पासून बावीस वर्षेंपर्यंत धरून, त्यावरून

1. "On the division of the Pandu sovereignty, the new kingdom of Indraprastha eclipsed that of Hastināpur. The brothers reduced to obedience the surrounding nations, and compelled their princes to sign tributary engagements (paenamah.")

(Tod's Räjasthan. P. 46.)

महाभारत युद्धाचा काल निश्चित करितात. आणि भारतीय इतिहासकार व पुराणें इत्यादि प्रत्येक कारकीर्द सरासरीच्या मानानें तीस किंवा एकतीस वर्षांची धरून, त्यावरून सदरहू युद्धाचा काल सिद्ध करितात. शिवाय, कित्येक राजांची कारकीर्द व वंशवेल हीं उपलब्ध होत नाहींत. त्यामुळें प्रत्येकाच्या हकीकतींत विसंगता प्राप्त होते, आणि तेणेंकरून कालाचा खात्रीपूर्वक निश्चय करण्यास अनेक अडचणी येतात.

तशांत, भारतीयांचें जेवढें कांहीं प्राचीन ह्मणून आहे, तेवढें सर्वच अर्वाचीन कालांत आणण्याकडे, बहुतेक युरोपस्थांच्या मनाचा स्वाभाविक कल[1] असतो. तेव्हां अशा प्रकारच्या मनाच्या ओघांत, बहुतेक पाश्चात्य कालाच्या व कारकीर्दीच्या मूलस्थितींत, निष्कारण छिन्नभिन्नता, आणि

---

1. * * * "But Col. Ellis does not seem to consider them to be weighty, and in the view he has put forth he but represents, in a somewhat exaggerated form, the tendency of *most Europeon scholars* and *antiquarians to modernize every thing Hindu.*"

(Consideration of the Date of Mahâ Bharata by Dr. Bhandarkar. J. R. A. S. N. 28. vol. x P. 82 )

निराधार फेरफार, व ओढाताण करितात, यांत फारसें नवल नाहीं.

असो. **अयोध्या** व **इंद्रप्रस्थ** येथलि राजांप्रमाणेंच **मगधदेशां**तलि नृपावलि सुप्रसिद्ध असून, त्यांची कारकीर्द फार महत्वाची आहे. सबब त्यांविषयीं थोडें दिग्दर्शन करितों.

मगध देशांतील राजे, व त्यांचा काल.

**मगधदेश** ह्मणजे सांप्रतचा **बहार** प्रांत होय. ह्याची गणना **प्राची** देशांत होत असून, त्याची राजधानी **पाटलिपुत्र** असे. ह्यालाच पूर्वीं **पुष्पपुर** किंवा **कुसुमपुर** ह्मणत, आणि तें **गंगा** व **शोण** ह्या दोन नद्यांच्या संगमाजवळ असे. **बहार** प्रांताची अर्वाचीन राजधानी **राजगृही** अथवा **राजमहाल** असून, त्यालाच हल्लीं **पाटणा** असें ह्मणतात.

---

1. "Mr. Bentley, taking this genealogy from the same authority as Sir William Jones, has *mutilated* it by a *transposition*, for which his reasons are insufficient, and militate against every opinion of the Hindus. Finding the names Vrihadbalu and Vridasura, declared to be princes contemporary with Yudhishthira, he *transposes the whole ten princes* of his list intervening between Takshak and Báhuman."

(Col. Tod's Rajasthan. P. 44.)

मगधदेशांतील राजे चंद्रवंशीच होत. ह्यांच्या वंशांतील राजा जरासंध व महाभारत युद्ध, हीं समकालीन असून, जरासंधाचा मुलगा सहदेव हा, सदरहु युद्धानंतर, मगधदेशाचा राजा झाला होता. जरासंधानंतरचा तेवीसावा राजा रिपुंजय, आणि पस्तीसावा अजातशत्रु, व एकेचाळीसावा नंद, असे असल्याविषयीं कांहीं राजवंशावलीवरून समजतें. अजात शत्रूचा काल इ० स० पूर्वी ५५० वर्षें असल्याविषयीं, तसेंच नंदाचा काल इ० स० पूर्वी ४०० वर्षें असल्याचें एल्फिन्स्टन इतिहासकाराचें ह्मणणें. आहे परंतु सदरहू काल खात्रीपूर्वक निश्चित करण्यास अडचण वाटते. अजाशत्रूनंतर (नंद धरून) सहा राजे झाले असून, त्या सर्वांची कारकीर्द एकंदर दीडशें वर्षांची असल्याचें सदरीं लिहिलेल्या कालनिर्देशावरून उघड होतें. ह्मणजे प्रत्येकाची कारकीर्द सरासरीच्या मानानें पंचवीस वर्षांची होती, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आतां, अजातशत्रुपासून पन्नासावा, अथवा नंदापासून ( ह्मणजे नंद सोडून ), नववा चंद्रगुप्त होय. ह्याची कारकीर्द भिन्न भिन्न ग्रंथकार[1] भिन्नभिन्न कालची सांगतात. तथापि,

---

[1] डाक्तर हन्टर. इ. स. पूर्वी ३२६ वर्षें. विल्फर्ड. इ. स. पूर्वी ३५० वर्षें. विल्सन्. इ. स. पूर्वी ३१५ वर्षें. महावंश इ. स. पूर्वी ३४७ वर्षें.

क्राफर्डकृत आव्हावरून इ. स. ३१२ पासून ३७६ पर्यंत त्याची कारकीर्द असल्याचें दिसतें.

त्याची कारकीर्द इ० स० पूर्वी ३९० वर्षे धरण्यास कांहीं हरकत नाहीं, असें मानिलें तर, नंद आणि चंद्रगुप्त यांच्या दरम्यान फक्त पन्नास वर्षांचेंच अंतर राहत असून, सदरहू वर्षें केवळ नऊ राजांतच विभागलीं गेल्या कारणानें, प्रत्येकाच्या वांटणीस सरासरीच्या मानानें पुरीं साडे पांच वर्षें देखील येत नाहींत. अथवा, डाक्तर हंटर इतिहासकारासच प्रमाणीभूत मानून चंद्रगुप्ताचा काल इ० स० पूर्वी ३२६ वर्षें धरला तरी देखील, प्रत्येक राजाची कारकीर्द साडे आठ वर्षांपेक्षां जास्त वर्षें भरत नाहीं. आतां , सतत नऊ राजांची कारकीर्द इतक्या अल्प कालाची असेल असें संभवत नाहीं. सबब, चंद्रगुप्त राजा पलीकडील नृपावलीच्या कारकीर्दीची कालमर्यादा करण्यास बलवत्तर साधन नसल्यामुळें, तत्संबंधीं साहस न करणें बरें दिसतें.

तथापि, इतकें मात्र खचित् सिद्धवत आहे कीं, चन्द्रगुप्ताच्या कारकीर्दीपासून आपण अगदीं ऐतिहासिक कालांत आहोंत, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. इतकेंच नाहीं तर, अंतर्बाह्य प्रमाणांवरून ह्याच्या वेळचा मुकाबिला समकालीन अशा अनेक गतगोष्टींशीं मिळत असून, द्वीपांतरीच्या ज्या राजांशीं ह्याचा व्यवहारसंबंध घडून आला होता, त्यांचे लेख, आणि तत्कालीन गृहस्थांचे दाखले, आपणांस चांगल्या प्रकारें उपलब्ध आहेत. व ते विश्वसनीय असल्या कारणानें त्यांवरून, आणि इक-

डील प्रमाणांवरून, **चन्द्रगुप्त** राजाचा काल निश्चित करण्यास यत्किंचितही अडचण पडत नाहीं.

चंद्रगुप्त.

**हिंदुस्थानावर शिकंदराची** स्वारी इसवी सनापूर्वी ३२७ व्या वर्षी झाली असून, त्यावेळींच **चंद्रगुप्त** होता यांत बिलकुल संशय नाहीं. आणि त्यानें सदरहू स्वारीच्या धामधुमीनंतर योग्य संधी पाहून, **नंद**राजकुलाच्या क्षीण वैभवावरच आपल्या ऐश्वर्याचा पाया रचण्याचें योजिलें. तदनंतर **मगध** देशाची ( **बहार** प्रांताची ) राजधानी **पाटलीपुत्र**,[1] इजवर स्वारी करून त्यानें ती आपल्या हस्तगत केली; व आपल्या दराऱ्यानें **पंजाबां**तील एतद्देशीय आणि **ग्रीक** मांडलिकांस, व इतर राजेरजवाड्यांस क़ाबीज करून, त्यानें त्या सर्वांस आपलें प्रभुत्व कबूल करण्यास लाविलें. ( इ० स० पू० ३१६ ). पुढें **सेल्यूकस्** नामक **ग्रीक** राजानें सरहद्दीवरील आपल्या ताब्यांतून गेलेले प्रांत पुनश्च काबीज करण्याचें योजिलें. परंतु **चंद्रगुप्ता**च्या पराक्रमापुढें त्याचें कांहींएक चालेनासें होऊन, त्याच्याशीं सलोख्यानें तह करणें त्यास अगदीं भाग पडलें; व **पंजाबां**तील सर्व प्रांत आणि **काबूल** खिंड यांजवरील आपला हक्क सोडून, शेवटीं **सेल्यूकस्**नें आपली कन्या देखील पाणिग्रहणार्थ **चंद्रगुप्त** राजास दिली, आणि **मिग्यास्थि**-

---

१ सांप्रतचें पाटणा शहर.

**नीज्** नामक आपला वकील त्याच्या दरबारीं ठेविला. (इ० स० पू० ३०६–२९८).

**चंद्रगुप्ता**नंतर त्याचा नातू जो सुप्रसिद्ध **अशोक** यानें आपल्या दिग्विजयाच्या पताका चोहोंकडे फडकावून, अखिल **भरतखंड**-भर आपलें साम्राज्य स्थापन केलें. **अशोका**चा काळ अजून निश्चित नाहीं. तथापि, इसवी सनापूर्वीच्या तिस-ऱ्या शतकाच्या मध्यंतरीं तो उदयास आला असावा, असें अगदीं नूतन शोधावरून समजतें. तो इ० स० पू. २६० व्या वर्षी सिंहासनारूढ झाला, व त्यानंतर तीन वर्षांनीं त्यानें **बौद्ध** धर्म स्वीकारला. (इ० स० पू. २५७) पुढें, त्यानें त्या धर्माचीं मूलतत्वें सर्व **भरतखंड**भर, व इतर ठिकाणीं, प्रसिद्ध केलीं, आणि तदर्थ त्यानें ८४,००० **स्तूप** उभारले. ह्याशिवाय, आणखी देखील तत्संबंधीं नानाविध चिरस्थायी कृत्यें त्यानें केलीं असून, त्यांपैकीं ११ न्यस्ताक्षरस्तंभ, १४ शिलालेख, आणि १७विवर लेख हल्लीं उपलब्ध आहेत.[1] ह्या स्तंभावर चक्रवर्ती **अशोक** राजाच्या चौदा आज्ञा[2] दाखल करण्यांत आल्या होत्या.

अशोक.

---

१ जनरल कानिंगहामकृत "कॉर्पस इन्स्क्रिपशनम् इन्डिकेरम्" नामक पुस्तक पहा.

२ ह्या १४ आज्ञा खालीं लिहिल्याप्रमाणें होतः—

( पुढें चालू )

अशोक बादशहाचें राज्य फार विस्तृत होतें. अफ-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

१ यज्ञाकरितां, किंवा उपजीविकेकरितां, प्राणिहत्या न करणें.

२ मनुष्यें आणि इतर प्राणी ह्यांच्याकरितां औषधोपचाराची तजवीज करणें, व रस्त्यावर विहिरी आणि बागा करणें.

३ दमनसंबंधीं नियम, व बौद्ध धर्मांतील महानीतितत्त्वें, यांची दर पांच वर्षांनीं पुनश्च प्रसिद्धि.

४ पूर्वीच्या राजांच्या कारकीर्दीची व अशोक राजाच्या अमलांतील सुखकर स्थितीची तुलना.

५ लोकांना बुद्ध धर्माची दीक्षा देण्याकरितां, भरतखंडांत व देशांतरीं, धर्मोपदेशकांची योजना करून, स्वसंतोषानें धर्मांतराचा प्रयत्न करणें.

६ नीतीचें संरक्षण व्हावें एतदर्थ, तपासनीस व कामगारांची योजना.

७ धर्म नियम एकसारखे करणें, व सर्वांची योग्यता एकसारखी आहे, असें दाखविणें.

८ पूर्वीच्या राजांचा विषयानंद, व अशोक राजाचा सदाचार संभोग, यांतील तुलना.

९ ज्या सद्‌गुणांपासून स्वर्गसुखाची प्राप्ति होते त्याचा महिमा लोकांच्या मनावर बिंबविणें.

१० क्षणभंगुर व निरर्थक असें ऐहिकवैभव, आणि पारलौकिक फलप्राप्तीसाठीं अशोक राजाचे प्रयत्न, यांची तुलना.

११ धर्मप्रसार अथवा नीतिशिक्षण हेंच उत्तम औदार्य, असें लोकांच्या मनांत ठसविणें.

१२ पाखंडी लोकांस उपदेश.

१३ ( ही आज्ञा अपूर्ण असल्यामुळें, तिचें तात्पर्य लक्षांत येत नाहीं. )

१४ हींत, वरील सर्व आज्ञा तात्पर्यानें एकवट केल्या आहेत.

गाणिस्थानापासून तों थेट पूर्वेकडील कालिंग[1] देशापर्यंत, आणि हिमालयापासून तों दक्षिण समुद्रापर्यंत, त्याच्या साम्राज्याच्या विजयध्वजा फडकत असत. ह्या ठिकाणीं अजून देखील, त्याच्या कारकीर्दीत उभारलेले शिलास्तंभ सांपडतात[2], व ह्यांजवरच बौद्ध धर्मातील प्रसिद्ध चौदा आज्ञा खोदलेल्या आढळतात.

अशोक बादशहानें आपल्या प्रजेच्या कल्याणार्थ

---

१ उत्तर सरकार प्रांत.

2. Such edicts are still found graven deep upon pillars, caves, and rocks, from the Yusafzai valley beyond Peshawar on th North-Western frontier, through the heart of Hindustan and the Central-Provinces, to Kathiawar in the west, and Orrisa in the east coast of India. Tradition states that Asoka set up 84,000 memorial columns or topes. The Chinese pilgrims come upon them in the inner Himalayas. Fort-two inscriptions still surviving show how widely these royal sermons were spread over India itself."

(Indian Empire P. 145.)

"Since this was written the discoveries of Mr. Compbell and Pandit Bhagwanlal at Supárà were announced. It would appear from the fragment of the eighth edict found at the place that Asoka's power extended down the coast up to Supàrá but the statement in the text about Maharashtra, or Dekkan remains true."

(Dr. Bhandarkar's History of the Dekkan.)

नानाप्रकारच्या तजविजी केल्या. लोकांस पाणी पिण्यासाठीं ठिकठिकाणीं विहिरी खोदल्या. छायेसाठीं रस्त्यावरून झाडें लाविलीं. अनेक जागीं धर्मशाळा बांधिल्या. रोगशमनार्थ वैद्यशाला स्थापिल्या. आणि लोकांस **औषध** देण्याकरितां आपल्या राज्यांत जागजागीं दवाखाने बांधिले. एकंदरीनें पाहतां, सांप्रतच्या एकोणीसाव्या शतकांत विशेष सुधारलेलीं राष्ट्रें लोककल्याणार्थ जे जे उपाय करितात, अथवा प्रजेच्या सोईसाठीं किंवा तिच्या दुःख शमनार्थ ज्या ज्या तजविजी अमलांत आणितात, त्या त्या सर्व **अशोक** राजानें दोन हजार वर्षांपलीकडील कालात योजिल्या असल्याचें दिसतें.

कांहीं कांहीं **पाश्चात्य** दर्पानें, अज्ञानानें, व उच्छृंखलपणानें, अशी वल्गना करितात कीं, **पौरस्त्य** लोकांत राज्यपद्धति नाहीं. त्यांचे राजे प्रजेच्या कल्याणार्थ अगदीं देखील पर्वा करीत नाहींत. लोककल्याण, आणि सार्वजनिक सोय, हीं त्यांच्या स्वप्नीं देखील नाहींत. दुःखशमनार्थ जरूर त्या तजविजी करण्याचें त्यांच्या गांवींही नाहीं. ते केवळ मूढ, स्वेच्छाचारी, आणि पशुतुल्य आहेत. त्यांच्यांत ज्ञान नाहीं, शास्त्र नाहीं, कला नाहीं, व विद्याभिरुचि देखील नाहीं; आणि म्हणूनच, **पाश्चात्याप्रमाणें**, ते सुधारलेल्या राष्ट्रांत मोडतही नाहींत.

आतां, ऐतिहासिक गोष्टींचें दूरवर आणि निःपक्षपातानें

अवलोकन केलें, आणि भारतीयांची ग्रंथसंपत्ति, त्यांचा विस्तीर्ण शास्त्रोदधि, त्यांचा कलासमुदाय, त्यांची धर्मसंस्था, स्वराज्यसंस्था, शिक्षणसंस्था, व लोककल्याणार्थ त्यांनीं उभारलेल्या असंख्य संस्था, याविषयीं चांगला विचार केला, तर सदरीं लिहिलेले उद्गार निव्वळ खोटे ठरतात. इतकेंच नाहीं तर, ते केवळ निरर्थक आहेत, असें **अशोकासारख्या** नामांकीत बादशाहाचा व इतर राजांचा ज्यांनीं ह्मणून इतिहास वाचला आहे, त्यांच्या लक्षांत आल्यावांचून खचित् राहणार नाहीं.

असो. **अशोक** बादशाहाचें धर्माकडे विशेष लक्ष्य होतें. आणि तो **बौद्ध** धर्मानुयायी असल्यामुळें त्या धर्माचा फैलाव **भरतखंडांत** व इतर देशांत व्हावा, ह्मणून त्यानें अश्रांत श्रम घेतले, आणि त्याला सर्व प्रकरें चांगला आश्रयही दिला.

याप्रमाणें, **बौद्ध** धर्माला चांगलाच राजाश्रय मिळाल्या कारणानें तो फार बळावला, आणि इतका फैलावला कीं, **भरतखंडाबाहेरील** प्रदेशांत देखील त्यानें आपलें डोकें वर केले, व कायमचें वर्चस्व स्थापिलें. त्यामुळें **अफगाणिस्थाना**-पासून तों तहत **चीन** समुद्रापर्यंत, आणि **मध्य आशिया**-पासून तों तहत **सिंहलद्वीपापर्यंत** सर्व लोक **बौद्ध** मतानुयायी झाले. याप्रमाणें देशहित, व लोककल्याणा-साठीं नानाविध प्रयत्न करून, **अशोक बादशहा** इ. स. पूर्वी २२३ व्या वर्षी मरण पावला.

**अशोक** हा **मौर्य** कुलांतला होय. **मौर्य** कुलाची गादी **चंद्रगुप्तानें** स्थापन केली, व **मगध** देशांत **मौर्यांचें** एकंदर राज्य दहा पिढ्यांपर्यंत चाललें. **मौर्यांचा** अंत इसवी सना-

शुंग राजे.

पूर्वी १८९ व्या वर्षी होऊन, त्यांचें उन्मूलन करणारे जे **शुंगराजे**, ते त्यांच्यानंतर सिंहासनारूढ झाले. **शुंग** राजांच्या दहा पिढ्या होऊन गेल्या, व त्यांनीं एकंदर ११२ वर्षें राज्य केलें. तथापि, सदरहू मुदतींत सुमारें पंचेचाळीस वर्षें, ह्मणजे इ० स० पू. ११८ पासून तों इ० स० पू. ७३ वर्षापर्यंत, **काण्व** अथवा **काण्वायन** यांचेंच वर्चस्व होतें. **काण्वायन**

काण्व नांवाचे ब्राह्मण राजे.

हे **ब्राम्हण**[1] असून ते प्रथमतः **शुंग**-राजांच्या पदरचे नोकर होते असें दिसतें. परंतु, **शुंग** राजे बलहीन झाल्यावर **काण्वांनीं** आपली सत्ता शनैः शनैः पूर्णपणें स्थापिली, आणि आपल्या पराक्रमानें त्यांनीं आपलें प्रभुत्व सर्वांस कबूल करण्यास लाविलें. तथापि, "समूलंच विनश्यति," असें त्यांनीं केलें नव्हतें. किंवा कुऱ्हाडीचा दांडा गातास काल, असें वर्तन करण्याचेंही त्यांनीं मनांत आणिलें नव्हतें.

**ब्राह्मणांच्या** हातीं अशा प्रकारची राजकीय सत्ता किंवा प्रभुत्व येतें, तेव्हां ते फारच कृतज्ञतेनें वागतात, आणि आपल्या मूळच्या यजमानांचें सौभाग्य राखतात.

---

१ चत्वारः[२]शुंगभृत्यास्ते नृपाः[१] काण्वायनद्विजाः । वायुपुराण.

ह्याचा दाखला जसा प्राचीनकाळीं इसवी सनापूर्वी दुसऱ्या शतकांत दृष्टिगोचर होतो, तसा सांप्रतकाळीं देखील इसवी सनाच्या अठराव्या शतकांत दृष्टीस पडतो. **पेशवे** हे केवळ **ब्राह्मण** राजेच होत. त्यांनीं अखिल **भरतखंड**भर आपला विजयध्वज फडकविला होता; त्यामुळें त्यांची सर्वत्र छाप बसली असून, त्यांचें प्रभुत्व सर्वमान्य झालें असतांही, ते **सातार**च्या गादीस विसरले नव्हत. आणि शेवटपर्यंत त्यांनीं **सातार**च्या राजांचें सौभाग्य कायम राखिलें होतें.

अंध्रभृत्य.

**काण्वायनां**चें प्रभुत्व पंचेचाळीस वर्षें चाललें, आणि त्या मुदतींत **शुंग** हे केवळ नांवाचेच राजे बनले होते. त्यांच्यानंतर **अंध्रभृत्य** राजे बलवान झाले, व त्यांनीं **शुंग** आणि **काण्व** यां दोहोंचेंही उन्मूलन केलें. ह्यांनीं इसवी सनापूर्वी ७३ वर्षांपासून तों इसवी सनानंतर २१८ वर्षांपर्यंत राज्य केलें. ह्याच राजांस **शालवाहन** अशींही संज्ञा आहे. ह्यांनीं आपला अम्मल **दक्षिणें**तही बसविला होता.

**अंध्रभृत्य** उर्फ **शातवाहन** या राजांनीं **दक्षिणें**तही सुमारें तीनशें वर्षें राज्य केलें, (इ० स० पू० ७३ सालापासून तों इ० स० २१८ वर्षेपर्यंत ). तदनंतर **दक्षिणापथां**त कोणी कोणी राज्य केलें, याविषयीं पुढील भागांत सविस्तर हकीगत लिहूं.

---

१ डाक्तर रा. गो. भांडारकरकृत दक्षिणचा इतिहास.

असो. अंध्रानंतर कोणकोणते राजे मगध देशांत होऊन गेले, याविषयीं सुसंगतवार हकीकत मिळत नाहीं. तथापि, इसवी सनाच्या चौथ्या किंवा पांचव्या शतकापासून तों सातव्या अथवा आठव्या शतकांपर्यंत, गुप्त नामक राजांनीं तेथें आपला अम्मल बसविला असावा, असें अनेक नाणीं आणि नानाविध शिलालेख, यांजवरून निर्विवाद सिद्ध होतें. हे गुप्तराजे कनोजचे होत.

गुप्त राजे.

मगध देशानंतर वंग देशाची ( ज्यास हल्लीं बंगाल ह्मणतात त्याची ) उपलब्ध असलेली माहिती देणें अगदीं अवश्य आहे. महाभारत युद्धाच्या कालीं, वंग देशाचा राजा मगध राजाचा दोस्त व सहायकारी असल्याविषयीं वर्णन आहे. त्याच्यापासून तों महमदीय दिग्विजयापर्यंत पांच पिढ्यांचा वृत्तांत अयेन-ई-अकबरींत दिला आहे. त्यांतच पाल नांवाच्या राजांविषयीं वर्णन असून, त्यांनीं इसवी सनाच्या नवव्या शतकापासून तों अकराव्या शतकापर्यंत राज्य केलें असल्याचें दिसतें.

बंगाल देशचे राजे. व त्यांचा काल.

ह्या सर्व राजांत देवपालदेव हा बलाढ्य व चक्रवर्ती असल्याचें एका पुराण ताम्रपत्रावरून कळून येतें. तसेंच बंगालच्या पाल नामक राजांविषयीं देखील अनेक शिलालेखांवरून असें समजतें कीं, त्यांची सत्ता सर्व हिंदुस्थान-

भर असून, **हिमालयापासून कन्याकुमारी** टोंकापर्यंत, व **ब्रह्मपुत्रा** नदीपासून तों **सिंधुनदीपर्यंत**, सर्व मुलूख त्यांच्या ताब्यांत असे. शिवाय, ह्या **वंगराजांनीं तिबेट** आणि **सिंधुनदीच्या** पश्चिमेकडील **कंबोज** देश सुद्धां, आपल्या हस्तगत केले असल्याविषयीं वर्णन आहे.

मोंगीर येथें जें एक ताम्रपत्र सांपडलें आहे, त्यावरून तें इसवी सनाच्या नवव्या शतकांत लिहिलेलें असल्याचें दिसतें. त्यांत असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, ' **गंगे**च्या उगमापासून तों तहत **लंके**पर्यंत, आणि **मेगना** अथवा **ब्रम्हपुत्रा** नदीपासून तों थेट पश्चिम समुद्रापर्यंतचा सर्व प्रदेश **देवपालदेव** राजाच्या ताब्यांत आहे. त्यानें **कंबोज** देशावर स्वारी केली आहे, आणि **बंगाल, तिबेट,** व **कर्नाटक** येथील सर्व प्रजा त्याचें प्रभुत्व कबूल करितात. तसेंच त्यानें **ओरिसा, कारोमांडल** किनाऱ्याचा दक्षिणभाग, आणि **गुजराथ** प्रांत, हे सर केले असून, **हूण** लोकांस त्यानें आपल्या ताब्यांत आणिलें आहे. ' इत्यादि.

**पाल** राजानंतर **सेन** नांवाचे राजे सिंहासनारूढ झाले, परंतु इ० स० १२०३ च्या सुमारास, **इस्लामशाहीच्या** सपाट्यांत ते सर्व लयास गेले.

**कनोज**चें राज्य देखील विशेष महत्वाचें आणि विस्तृत

1. The Rajputs, as well as Mahomedan writers,

( पुढें चालू )

कनोजचें राज्य व त्याचा काल.

असल्याविषयीं ख्याति आहे. इतकेंच[1] नाहीं तर, तेथील राजास अनेक ग्रंथकार **चक्रवर्ती** असाही किताब देतात. **कनोज** किंवा **कान्यकुब्ज** यालाच पूर्वी **पंचाल**[2] देश ह्मणत असत. ह्या राज्याची पश्चिम सरहद्द स्थूलमानानें ह्मटली ह्मणजे **यमुना** ( **कालिंदी** ) नदी, आणि **चंबळ**-नदीच्या पलीकडे **अरवलि** पर्वतापर्यंत असून, दक्षिणेस बुंदेलखंडच्या पलीकडे **विंध्य** पर्वतापर्यंत, व पूर्वेस **बनारस**[3], आणि उत्तरेस नेपाळच्या पलीकडील **हिमालय** पर्वतापर्यंत असे.

**कालिंदी** नदीच्या पश्चिमेकडील टापूंत **दिल्लीच्या**

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

who describe the conquest of India, dwell in terms of the highest admiration on the extent and magni ficence of the capital of this kingdom, the ruins of which are still to be seen on the Ganges "

( Elphinstone's India. P. 410.)

1. Some Mahomedan writers pay the raja the usual compliment of supposing him emperor of India; and Ebn Haukal, a century before Mahmud, mentions Canouj as the chief city of India.

( Onseley's Ebn Haukal P. 9.")
Elphinstone's History of Iudia. P. 554.

२. ( पंचालाः कान्यकुब्जदेशाः ) । मनुस्मृति. अ २. श्लो. १९.

३. काशी.

दिल्लीचें राज्य, व पृथिवीपति.

प्रभूची सत्ता असून, ह्या राज्याची मर्यादा म्हटली म्हणजे उत्तरेस **हिमाचल**, पूर्वेस **यमुना** नदी, दक्षिणेस **अरवलि** पर्वत, आणि पश्चिमेस **सिंधु** नदी व तिच्या विस्तृत शाखा होत.

इ० स० ११९३, ह्मणजे संवत् १२४९ सालीं, **कनोज**चा राजा **जयचंद** असून, **दिल्ली**चा प्रभु **पृथ्वीराजा** होता. आपल्या कन्येचा स्वयंवर करण्याच्या निमित्यानें **जयचंदानें** यच्चावत् सर्व मांडलिक आणि राजेरजवाड्यांस निमंत्रण करून, आपलें चक्रवर्तित्व स्थापन करण्याचें मनांत आणिलें, व त्याप्रमाणें सर्व देशाचे राजे आणि मांडलिक प्रभु त्याच्या **दरबारीं** हजरही झाले. परंतु **दिल्ली**चा **पृथ्वी** राजा, व **मेवाड**चा राजपुत्र **समर**, ह्यांस ती गोष्ट न रुचून ते त्याच्या दरबारीं गेले नाहींत. त्या कारणानें **जयचंद** राजानें त्यांच्या नांवाचे सोन्याचे पुतळे बनवून, अति नीच कामावर त्यांची योजना केली. तदनंतर स्वयंवराचा सर्व थाट **जयचंद** राजाच्या **दरबारीं मांड**लिक प्रभूंच्या नजरेखालीं यथास्थितपणें चालत असतां, **पृथ्वीराजानें जयचंदा**ची एकुलती एक कन्या अचानक पळवून नेली. त्यामुळें, लग्नाची सर्व तयारी जागच्याजागीं राहून, **पृथ्वीराजा**चा **जयचंदानें** पाटलाग केला, आणि तो हातीं न सांपडल्या कारणानें त्यानें **घोर**चा राजा जो

**शाहाबुद्दीन** याची मदत मागितली. असें करण्यांत त्यानें बिलकुल दूरदृष्टि पोहोंचविली नाहीं. इतकेंच नाहीं तर, त्यानें त्या कामांत फारच महत्वाची चूक आणि राजकीय प्रमाद केला. त्यामुळें, हिंदूंचें अनादि **स्वातंत्र्य नष्ट** होण्यास कारण झालें, व **मुसलमानांचा** शिरकाव झाला. दोघांचा तंटा आणि तिसऱ्याचा लाभ, अशी दुर्लभ संधी **शाहाबुद्दीनानें** पाहून, तो **जयचंदाच्या** मदतीस आला; आणि **पृथ्वीराजास** पदच्युत करून, शेवटीं **जयचंदाच्या**-ही हातावर त्यानें तुरी दिल्या, व त्याच्या राजधानीवर हल्ला करून ती घेतली. पुढें **जयचंद गंगा** नदींत बुडून मरण पावला. ह्याप्रमाणें **कनोजच्या** गादीचा शेवट झाला, आणि **इसलामशाही** जोरावली. ( इ. स. ११९३. )

मालव देशचे राजे, व त्यांचा काल.

**विक्रमादित्यानें** आपली गादी **माळवा** प्रांतांत **उज्जनी** येथें स्थापिली, आणि आपल्या नांवाचा शक इसवी सनापूर्वी ५६ व्या वर्षी सुरू केला. हा फार पराक्रमी आणि बलवान् राजा असून, विद्येचा मोठा पोषिंदा असे. त्यामुळें त्याच्या विस्तीर्ण राज्यांत हरएक शास्त्राची व कलेची अभिवृद्धि होऊन, त्याची प्रजा फार सुखी, नीतिमान, आणि विद्याविशारद झाली. हा राजा चक्रवर्ती असून, त्याच्या अमलाखालीं पुष्कळ मुलूख होता.

**विक्रमादित्यानंतर** अनेक राजे होऊन गेल्यावर

**भोजराजा** झाला. हा इसवी सनाच्या अकराव्या शतकाच्या उत्तरार्धांत उदयास आला असून, त्यानें पुष्कळ वर्षें राज्य केलें. हा **हिंदुस्थान**च्या नामांकित राजांपैकीं एक राजा होय. **माळव्याचें** स्वातंत्र्य **भोजराजाच्या** नातवाच्या कारकीर्दींत नष्ट झालें होतें. कारण, **गुजराथ**-च्या राजानें तो प्रांत काबीज करून त्या राजासही कैद केलें. तथापि, दुसऱ्या कारकीर्दींत तें गतवैभव फिरून प्राप्त होऊन, सरते शेवटीं तें इ० स० १२३१ व्या वर्षी **इसलाम**शाहींत पुनश्च नष्ट झालें.

गुजराथचे राजे, व त्यांचा काळ.

**गुजराथ** द्वीपकल्प हें अनेक शतकें, स्वतंत्र आणि एकाच अधिपतीच्या अमलाखालीं असावें, असें वाटतें. **श्रीकृष्णानें** आपली राजधानी याच द्वीपकल्पांत **द्वारिका** नगरीं स्थापिली असून, त्याची सत्ता पुष्कळ फैलावलेली होती. हा **चंद्रवंशीय** राजा होता, आणि **भारत** युद्धांत तो **पांडवां**कडील पक्षाचा असल्याचें सुप्रसिद्ध आहे.

ह्याच्यानंतर अनेक राजे होऊन गेल्यावर, इसवी सनाच्या दुसऱ्या शतकाच्या मध्यंतरीं, **सूर्य** वंशांतील **कनकसेन** नामक राजपुत्रानें आपली गादी याच द्वीपकल्पांत **बल्लवी** येथें स्थापिली. पुढें **सेन** वंशांतील राजांनीं येथें सुमारें

१ व्हिन्सेन्ट्स् पेरिप्लूस् पहा. पान १११.

चारशें वर्षें राज्य केलें, ( इ० स० १४४ पासून ५२४ पर्यंत ), आणि तदनंतर त्यांस **यवनांनीं** ( पारसीकांनीं ) तेथून हांकून लाविलें. हा पारसीक **नुशीरवान** राजा असून, त्यानें इ० स० ५३१ पासून ५७९ पर्यंत राज्य केलें.

**सेन** राजांनंतर **चौर** नामक राजांनीं ह्या द्वीपकल्पांत राज्य केलें, आणि इ० स० ७४६ व्या वर्षीं, त्यांनीं आपली गादी **अनहलवाड्यास** नेऊन, तेथेंच आपल्या राजधानीचें ठिकाण कायम केलें. हिलाच हल्लीं **पट्टण** असें ह्मणतात. ह्या घराण्यांतील शेवटला राजा इ० स० ९३१ त मरण पावल्यावर, त्याला औरस पुत्र नसल्यामुळें, **चालुक्य ( सालोंक )** घराण्यांतील राजपुत्र जो त्याचा जामात, तोच त्याच्या गादीवर बसला. ह्या राजांनीं इ० स० १२२८ पर्यंत आपली गादी संभाळली. तदनंतर दुसऱ्या एका राजानें त्यांस पदच्युत केलें, आणि शेवटीं त्याचीही **इसलामी** अमलांत वाताहात झाली. ( इ० स० १२९७ ).

याप्रमाणें **उत्तरहिंदुस्थानांतील** नृपावलीची हकीकत झाली. आतां, **दक्षिण हिंदुस्थान** किंवा **दक्षिण** येथील इतिहासाकडे वळूं, आणि ह्या सुप्रसिद्ध द्वीपकल्पांत कोठकोठें, व केव्हां पासूनचें आमच्या **आर्यांचें** दळणवळण होतें, याविषयीं कांहीं ऐतिहासिक प्रमाण मिळालें तर पाहूं.



# भाग १८ वा.

## दक्षिण हिंदुस्थानांतील

प्राचीन

## नृपावलि.

## दक्षिण हिंदुस्थान

अथवा

## दक्षिणापथ.

दक्षिणा पथ, व त्याची मर्यादा.

प्राचीनकाळीं विंध्याद्रीच्या पलीकडील दक्षिण बाजूच्या प्रांताला दक्षिणापथ किंवा दक्षिण ह्मणत असत. आणि वास्तविक पाहिलें तर उत्तर हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थान यांच्या दरम्यानची स्थूल मर्यादा विंध्याचलच होय. तथापि, प्रचारांत नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील प्रांताला दक्षिण ह्मणतात. मात्र ही नर्मदा आणि दमणगंगा ( वाण गंगा ), व सह्याद्रि आणि समुद्र कांठ, यांच्या दरम्यानचा मुलूख गुजराथेंत मोडतो.

सबब तो खेरीज करून, बाकीचा प्रदेश **दक्षिणापथ** किंवा **दक्षिण** समजण्यांचा.

**विंध्याद्रीच्या** पलीकडे दक्षिणेस, **अगस्त्य** ऋषीनें पहिलेंच[1] आश्रम बांधिला, आणि तदनंतर हळूहळू ह्या बाजूनें जास्त दळणवळण पडत चाललें असावें. इकडील बाजूला **आर्य** दिग्विजयी लोकांनीं काबीज केलेला पहिला प्रांत **वैदर्भ**[2] असावा असें वाटतें. कारण, **रावणानें सीतेला** नेल्यानंतर, तिच्या शोधार्थ **सुग्रीवानें** जेव्हां आपल्या अनुयायिजनांस ठिकठिकाणीं पाठविलें, तेव्हां **विदर्भ, ऋषीक, महिषक, दंडकारण्य, गोदावरी,**[3] इत्यादि प्रदेशांत तिचा तपास करण्याविषयीं त्यांस सांगितलें होतें. त्यावरून, त्या काळीं सदरहू प्रांतांची थोडीबहुत माहिती होती, यांत संशय नाहीं.

आतां **रामायण** आणि **महाभारत** या दोन्ही महाकाव्यांत **महाराष्ट्र** देशाचा बिलकूल नामनिर्देश नाहीं. सबब तो प्रांत कोणता, व त्याला पूर्वी काय ह्मणत असत, अथवा तो कोणत्या नांवानें ओळखिला जात असे, याविषयीं थोडेसें दिग्दर्शन केलें पाहिजे.

आमचे **हिंदु** लोक जीं नित्य नैमित्तिक कर्में करितात,

---

१ डाक्तर भांडारकरकृत दक्षिणचा इतिहास.

२ वऱ्हाड प्रांत.

३ रामायण. ( ४–४१ ).

महाराष्ट्र व त्याची मर्यादा.

तीं करिते वेळेस ज्या ज्या देशांत आणि कालांत तीं करण्यांत येतात, त्या त्या देशांचा व कालाचा उल्लेख त्यांत अवश्य झाला पाहिजे, असा आमच्या धर्मशास्त्राचा नियम आहे. त्याप्रमाणें, आम्ही महाराष्ट्रीयजन जेव्हां जेव्हां हीं कर्मे करितों, तेव्हां तेव्हां खालीं लिहिलेला मंत्रम्हणून, आम्हीं आपलीं नित्यनैमित्तिक कर्मे करण्यास सुरुवात करितों:

" भरतवर्षे, भरतखंडे, जंबूद्वीपे, दंडकारण्येदेशे गोदावर्याः दक्षिणेतीरे, कृष्णावेण्यायाः उत्तरेतीरे, शालिवाहन शके, बौद्धावतारे, कलियुगे " इत्यादि.

सदरहू मंत्रांत दंडकारण्य देशाची मर्यादा सांगितली आहे; व त्यावरून दंडकारण्य देश म्हणजे गोदावरी आणि कृष्णा या दोन नद्यांच्या दरम्यानचा प्रांत होय. परंतु महाराष्ट्र देशाची देखील हीच मर्यादा होती. म्हणून दंडकारण्य आणि महाराष्ट्र हे प्रांत एकच व समाविष्ट असून, त्यांचें पहिलें म्हणजे दंडकारण्य हें प्राचीन, व दुसरें म्हणजे महाराष्ट्र देश हें अर्वाचीन नांव होय.

याप्रमाणें दंडकारण्य किंवा महाराष्ट्र याचा दक्षिणेंत समावेश होत असून, चोल अथवा सांप्रतचें तंजावर, पांड्य अथवा मदूरा, आणि केरल अथवा मलबार,

---

१ डा. भांडारकरकृत दक्षिणचा इतिहास.

यांचा देखील त्यांतच अंतर्भाव होत होता, असें मार्कंडेय, मत्स्य, आणि वायु पुराणांवरून कळून येतें:

"तेषां परे जनपदा दक्षिणाः पथवासिनः ।
पांड्याश्च केरलाश्चैव चोलाः कुल्यास्तथैवच ॥"

सहदेवानें पांड्य, द्रविड, उद्र, केरल, आणि अंध्रदेश जिंकिलें असल्याविषयीं महाभारतांत वर्णन आहे. तसेंच तो किष्किंध, करहाटक, शूर्पारक, व दंडक, येथेंही गेला असल्याविषयीं सांगितलें आहे. त्यावरून त्या काळीं हा दक्षिणदिशेकडील मुलूख खचित् माहित असावा असें वाटतें.

इसवी सनापूर्वी अनेक शतकें, दक्षिणपथांत कोण-कोण राजे होऊन गेले, व त्यांनीं कोठकोठें किती वर्षें राज्य केलें, याविषयींची साद्यंत हकीकत किंवा सुसंगत-

1. Bibliothica Indica. Edn. (Chapter 57. V. 45).

२ पुणें छापील प्रत. ११२ ( ४६ ).

3. Bibliothica Indica Edn. ( 45. V. 124 ).

४ सभापर्व. अध्याय ३१.

५ हा देश हंपी ( पंपा सरोवरा ) जवळ असून, येथेंच सुग्रीवाला राम भेटला होता. (डाक्तर रा. गो. भांडारकरकृत दक्षिणचा इतिहास.)

६ हल्लींचें कऱ्हाड ( कृष्णा नदीवरील. ).

७ हल्लींचें सुपारा ( वसई नजीक ).

८ दंडकारण्य.

वार इतिहास उपलब्ध नाहीं. मात्र, **पुराणां**तरीं याविषयींची थोडीबहुत माहिती दिली आहे, परंतु तिजवरून अवश्य ती हकीकत खात्रीपूर्वक कळून येत नाहीं.

सांप्रत, ही उणीव, सर्वांशीं नाहीं तरी बहुतेक, भरून आल्यासारखी आहे. त्याबद्दलचें सर्व श्रेय विद्वन्मणि **डाक्तर रा. गो. भांडारकर** यांजकडे आहे; आणि तें त्यांच्या परिश्रमशीलतेचें व दीर्घ उद्योगाचेंच सर्व फल होय. ह्या बहुश्रुत **पंडितांनीं** स्तूप आणि स्तंभलेख, विवर व शिलालेख, पुराणें आणि कथानकें, इत्यादिकांच्या साहाय्यानें **दक्षिण**चा इतिहास लिहिला आहे. व ज्या ज्या ठिकाणीं **पुराणां**त विसंगता दृष्टीस पडते, तेथें तेथें त्यांनीं योग्य कारणासह सुसंगतवार मेळ लावून दिला आहे.[१]

---

# महाराष्ट्र.

महाराष्ट्रांतील राजे, व त्यांचा काल.

**उत्तरहिंदुस्थानांत** जे अंध्रभृत्य राजे होऊन गेले, आणि ज्यांनीं **शुंग** नांवाच्या नृपतींचे व **काण्व** नामक बलाढ्य **ब्राह्मण** राजांचें उन्मूलन केलें, त्यांनींच **दक्षि-**

---

१ ह्या अत्युपयुक्त ग्रंथांतील माहितीचा, मी ठिकठिकाणीं, कृतज्ञतापूर्वक उपयोग केला आहे. ( ग्रंथकर्ता ).

णेंत राज्य केलें असून, इकडे ( दक्षिणापथांत ) त्यांच्या राजधानीचें ठिकाण महाराष्ट्र आणि तैलंगण या दोन देशांत असे. महाराष्ट्रांत त्यांची गादी प्रतिष्ठान[1] नगरीं असे, आणि तैलंगणांत धनकेटक[2] येथें असे. ह्यानांच अंध्र किंवा शातवाहन अथवा शालिवाहन म्हणत असून,

शातवाहन राजे. ह्यांनीं इसवी सनापूर्वी ७३ व्या वर्षापासून, तों इसवी सनानंतर २१८ वर्षेपर्यंत राज्य केलें. ह्यांपैकीं ज्येष्ठ राजपुत्र हे धनकटक येथें राज्य करीत, आणि कनिष्ट पैठण येथें राज्य चालवीत; व ती मोठी गादी खाली झाली ह्मणजे येथलेच राजे त्या गादीला पात्र असल्यामुळें, हेच तिकडील गादीवर जाऊन बसत.

---

## अंध्र राजे.

अंध्र राजे. अंध्रांचा पहिला राजा सिमुक होता. व त्यानें इ० स० पू० ७३ पासून इ० स० पू० ६० वर्षेपर्यंत दक्षणेंत राज्य केलें. तदनंतर दक्षिणाधिपति कृष्ण नामक राजा झाला, व तो इ० स० पू० ४० व्या वर्षी मरण पावला. त्याच्या पा-

---

१ सांप्रतचें पैठण शहर.

२ मद्रास इलाख्यांत गंटूर जिल्ह्यांत धरणिकोट ह्मणून जें गांव आहे, तें आणि धनकटक एकच असावें असें म्हणतात.

ठीमागून **शातकर्णि** हा गादीवर बसला, व त्यानें इ० स० नंतर १६ वर्षें राज्य केलें. पुढें सुमारें एक शतकपर्यंत **क्षहरात** किंवा **क्षत्रप**[1] नामक परकीयांचा या देशावर अम्मल होता. परंतु तो **गोतमीपुत्रानें**[2] लवकरच झुगारून देऊन, त्या **क्षत्रपांस** त्यानें **दक्षिणेंतून** हांकून लाविलें, आणि आपण राजा झाला. **गोतमीपुत्रानें** इ० स० १३३ पासून १५४ पर्यंत **दक्षिणेंत** राज्य केलें. ह्याच्या मुलाचें नांव **पुलुमायि** असून, तोही आपल्या बापाप्रमाणेंच मोठा शूर होता. ह्याचा बाप **तैलंगणांत धनकटक** येथें राज्य करीत असतां, हा स्वतः **महाराष्ट्रांत पैठण** नगरींत आपलें प्रभुत्व चालवीत होता. ह्मणून, हे दोघेजण ह्या दोन भिन्न देशाचे समकालीनच राजे होते, असें ह्मणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

आता, **महाराष्ट्रांत** आणि **तैलंगणांत** कोणी किती वर्षें राज्य केलें, याविषयींचें थोडें दिग्दर्शन करीतों, त्यावरून चांगलें ध्यानांत येईल.

## महाराष्ट्र.

**पुलुमायि.** .................... इ० स० १३०——१५४.
**यज्ञश्री.** .................... इ० स० १५४—१७२.
**माधरीपुत्र.** .................... इ० स० १७२—१८०.

१ इराणी "सेट्रप" शब्दाचा हा संस्कृत अपभ्रंश होय.

२ हा शातवाहन किंवा अंध्र होय.

## तैलंगण.

पुलुमायि. ..................... इ० स० १९४—१९८.

ह्यानेंच इ० स० १३० पासून १९४ पर्यंत महाराष्ट्रांत राज्य केलें, आणि त्याचा बाप गोतमीपुत्र मरण पावल्यावर आपण येथील गादीवर बसला.

शिवश्री. ..................... इ० स० १९८—१९९.
शिवस्कंद..................... इ० स० १९९—१७२.
यज्ञश्री. ..................... इ० स० १७२—२०२.
विजय. ..................... इ० स० २०२—२०८.
चंद्रश्री. ..................... इ० स० २०८—२११.
पुलोमवी..................... इ० स० २११—२१८.

शातवाहन राजांच्या कारकीर्दीतील वैभव,

**अंध्रभृत्य** अथवा ज्यास **शातवाहन** किंवा **शालिवाहन** ह्मणतात, त्यांची कारकीर्द पुष्कळ भरभराटीची होती, यांत संशय नाहीं. कारण, त्या कारकीर्दीत देशवैभव, व्यापार, विद्याभिरुचि, आणि धर्मजिज्ञासा, हीं सर्व बऱ्याच चढत्या कलेप्रत पावलीं होतीं.

मांडलिक राजे आपणांस **महाभोज**, व मोठमोठे वीर आपणांस **महारथी** ह्मणवीत, आणि आपल्या नांवा-

प्रमाणेंच ते अलौकिक पराक्रमही करीत. शौर्याप्रमाणेंच व्यापाराची देखील त्यावेळेस चांगली तेजी होती, आणि कलेच्या अभिवृद्धीकडे राजाचें व प्रजेचें विशेष लक्ष्य असे. शहरांत मोठमोठे व्यापारी आणि सावकार असत. धान्याच्या प्रचंड वखारी ठिकठिकाणीं असून, त्याचा फार दूरदेशीं व्यापार चाले. सुतार काम, सोनार काम, विणकर काम, रंगाचें काम, वगैरे फारच मासलेदार होई. सुगंधी-तेलें, अत्तरें, अर्गजा, कस्तुरी, इत्यादि नाना प्रकारचे पदार्थ, व परिमल द्रव्यें, जिकडे तिकडे मिळत. गांध्यांचीं दुकानें इतस्ततः मांडलेलीं दृष्टीस पडत. आणि हरएक प्रकारचे लोक आपापल्या योग्यतेनुरूप नाना प्रकारचे विलास व आयेषआराम भोगीत.

व्यापार,

**पश्चिम** समुद्रांतील फार दूरदूरचीं गलबतें इकडे व्यापार करण्यासाठीं येत असत, व त्यांचा विशेषतः **भडोच**[१] शहराशींच संबंध असे; आणि येथूनच आंतील प्रदेशांतील अन्य देशांत माल जाई. इकडचा माल देखील विशेष सुबक असल्यामुळें, त्याजवर सर्वांच्या उड्या पडत, व तो देशांतरीं फार दूर दूर ठिकाणीं धाडीत असत.

त्या वेळीं **दक्षिणें**तील अति प्रसिद्ध शहर ह्मटलें

---

१ हें प्राचीनचें भृगु क्षेत्र होय. पेरिप्लस् नामक ग्रंथांत, ह्याच शहराला बरुगझा, किंवा भरुकच्छ, असें ह्मटलें आहे.

ह्मणजे **पैठण** होय. हें भरूचपासून वीस दिवसांच्या वाटेवर दक्षिण दिशेला असल्या विषयीं **पेरिप्लुस्** नामक ग्रंथांत वर्णन आहे. तसेंच, तेथून दहा दिवसांच्या वाटेवर पूर्वेस **तगर** शहर असल्याचें त्यांत सांगितलें आहे. ह्या शहरांतून मौल्यवान खडे, उत्तम प्रकारचें कापड, मलमल, आणि कापूस, रवाना होत असे, व तो जलमार्गानें फार दूरदूर देशीं जाई.

प्राचीन प्रख्यात शहरें.

सदरहू ग्रंथांत **सूर्पार**[२], **कल्लीण**[३], **सेमुल्ल**[४], **मंदेगोर**[५], **पलाईपॅटमाई**[६], **मेलीझेगर**[७], **बुझांशर्न**[८], इत्यादि बंदरांचाही उल्लेख आहे.

---

1 Indian Antiquary. vol. VIII.

तगर हेंच जुन्नर असल्याविषयीं कित्येकांचें म्हणणें असून कांहींच्या मताप्रमाणें तें देवगिरि असावें. डाक्तर रा. गो. भांडारकर यांच्या मतें तें निजाम संस्थानांतील धारूर होय;

२ हें सांप्रतचे सुपारें गांव होय. ह्यालाच पुराणांतरीं शूर्पारक ह्मणत असत. हें वसईनजीक आहे.

३ हल्लींचें कल्याण.

४ हें चेंबूर किंवा चौल असावें.

५ हें सांप्रतचे मांदाड होय. ह्याचें मूळचें नांव मंदगड असून, तें राजपुरी खाडीवर कुड्यानजीक आहे. कुडें येथें प्राचीन काळचीं लेणीं आहेत.

६ हें महाडानजीकचें पालें गांव होय.

७ सांप्रतचें जयगड.

८ हें विजयदुर्ग असावें असें वाटतें.

त्यावेळीं व्यापार आणि उदीम पुष्कळ चाले, व तेणें-करून देशांत समृद्धि असे. पुष्कळ लोक सधन व श्रीमान असत. शेटसावकार धर्मप्रीत्यर्थ लाखो रुपये खर्च करीत, आणि प्रवासी व उतारू लोकांकरितां राहण्यासाठीं, रह-दारीच्या ठिकाणीं, मोठमोठालीं विवरें, गुहा, व विहिरी खोदून काढीत. **कार्ली, कान्हेरी, कुडें,** इत्यादि ठिका-णच्या गुहा, अशाच कामाकरितां तयार केलेल्या होत.

स्वराज्य संस्था,

**स्थानिक** स्वराज्य, ज्याचा चालू एकोणिसाव्या शत-कांत मोठा बडिजाव वाटत आहे तें तर, हिंदु समाजांत आणि राजकीय पद्धतींत अगदीं खिळलेलेंच दिसतें. वणिक् समाज, ज्याला **श्रेणी** असें म्हणत ते, तसेंच कोष्टी व साळी, गांधी आणि तेली, इत्यादि आपापले कारभार मोठ्या दक्षतेनें आणि व्यवस्थितपणें चालवीत.

---

1. Their organization seems to be complete and effective, since, as already mentioned they received permanent deposits of money and paid interest on them from generation to generation. Self-Government by means of such guilds and village communities has always formed an important factor of the political administration of the country."

(Early History of the Dekkan).

सुधराई खातें.

हल्लींप्रमाणें त्यावेळेस ही सुधराई[1][2] खातें होतें, असें आतां स्पष्टपणें कळून येतें. कारण, उष्वदात नामक राजाच्या शिलालेखावर निगमसभेचा उल्लेख केला आहे. त्यावरून स्थानिक स्वराज्याची अमूल्य संस्था त्या प्राचीन काळीं देखील होती, यांत संशय नाहीं. ज्या संस्था आमच्या भरतखंडांत अनादिसिद्ध व प्राचीन काळापासून चालत आल्या आहेत, त्यांचा उदय आतांशा कोठें पाश्चात्य राष्ट्रांत होऊं लागला आहे. सबब एतत्संबंधीं वृथागर्व, किंवा अन्यथा दर्प, अथवा पोकळ अभिमान वाहण्याचें, पाश्चात्य गौरकायास यत्किंचित् देखील कारण नाहीं.

असो. अंध्रभृत्यांच्या कारकीर्दींत दक्षिणेंत चांगली शांतता व स्थैर्य असल्याचें दिसतें. कारण, देशांत स्वस्थता असली म्हणजे जीं जीं लक्षणें दृष्टीस पडतात, किंवा जे जे परिणाम घडून येतात, ते ते सर्व ह्या कारकीर्दींत दृष्टिगोचर होत होते.

१ दळण वळणाचीं साधनें, २ व्यापाराची उन्नति, ३ विद्याप्रसार, ४ स्थानिक स्वराज्य संस्था, ५ राज्याची बळकटी, ६ अर्थ आणि जीविताचें संरक्षण, ७ परधर्मसहिष्णुता, इत्यादि सर्व, प्रत्येक राष्ट्राच्या व देशाच्या,

---

१ ज्याला हल्लीं इंग्रजींत म्युनिसिपालिटी ह्मणतात तें.

2. Town-corporation.

भरभराटीचीं द्योतक होत. आणि ह्या सर्व गोष्टी ज्या ज्या ठिकाणीं नांदतात, त्या त्या ठिकाणची राज्यव्यवस्था स्पृहणीय व अभिनंदनीय होय, यांत संशय नाहीं.

दळणवळणाचीं साधनें.

**वैजयंती** ( दक्षिण **कोंकण** ), **सुपारें** व **कल्याण** ( **उत्तर कोंकण** ), **नासिक**, **कऱ्हाड**, आणि **जुन्नर** ( **घांटा**वरील प्रांत ), **भडोच** ( **गुजराथ** प्रांत ), **जबलपूर** व **अलाहाबाद** (**उत्तरहिंदुस्थान**), आणि **दातामित्री** ( **सिंध**प्रांत ), ह्या सर्व ठिकाणीं एकमेकांत परस्पर पुष्कळ दळणवळण असल्याचें दिसतें. कारण, एका प्रांताच्या लोकांनीं अन्य प्रांतांतील धर्मसंस्थेस नेमणूक करून दिल्याचें, **स्तूप** आणि **शिला**लेखावरून स्पष्टपणें कळून येतें. आणि जर त्याकाळीं दळणवळणाचीं चांगलीं साधनें उपलब्ध नसतीं तर, अशा धर्मकृत्याच्या देणग्या ठिकठिकाणीं देण्यांत आल्याच नसत्या.

विद्याभिरुचि.

त्या वेळचे लोक व्यापाराच्या तेजीमुळें पुष्कळ श्रीमंत झाले होते, आणि त्यामुळें ते धर्मकृत्यांत अमूप पैसा देत.

उपलब्ध असलेल्या साधनांवरून तर असें कळून येतें कीं, ह्यावेळीं विद्येचाही फैलाव पुष्कळ असे. **पैशाची बृहत्कथा**नामक सुरस व मनोरंजक ग्रंथ **अंध्रभृत्य** किंवा **शालिवाहनां**च्या कारकीर्दीतच उदयास आला. ह्याविष-

यांची अशी हकीगत आहे कीं, **शातवाहन** राजाचा **गुणाढ्य** नामक सुप्रसिद्ध मंत्री होता. त्याला **कर्णभूति** नामक पिशाचानें कित्येक मनोवेधक आणि रमणीय गोष्टी सांगितल्या असल्यामुळें, त्या रक्ताक्षरानें लिहून **गुणाढ्यानें** त्यांचीं सात पुस्तकें रचिलीं होतीं. त्यांतील कथा चित्ताकर्षक आणि फारच हृदयद्रावक असल्या कारणानें, **गुणाढ्यानें** तीं सातहीं पुस्तकें आपल्या राजास नजर केलीं. परंतु तीं **पैशा**ची भाषेंत आणि रक्तानें लिहिलेलीं असल्यामुळें राजानें तीं स्वीकारण्याचें नाकारलें. त्या गोष्टीचा **गुणाढ्यास** विषाद वाटून, त्यानें त्यांपैकीं पहिलीं सहा पुस्तकें जाळून टाकिलीं. पुढें कांहीं कालानें सदरहू कथा रसभरित असल्याविषयीं **शातवाहन** राजास कळल्यावरून, त्यानें तीं पुस्तकें **गुणाढ्याच्या** घरीं जाऊन मागितलीं. परंतु त्यांपैकीं शेवटलें सातवें पुस्तकच राहिलें असल्यामुळें, राजानें तें त्याच्या शिष्यमंडळीपासून, त्याच्याच परवानगीनें मागून घेतलें.[1]

**सप्तशती** नांवाचें काव्य देखील ह्याच कारकीर्दीतील होय. हें **महाराष्ट्री** भाषेंत असून, बहुतेक शृंगारपर आहे; व तें **आर्यावृत्तांत** लिहिलेलें आहे. ह्याचा कर्ता **हाल** असल्याविषयीं त्याच काव्याच्या तिसऱ्या श्लोकांत वर्णन आहे, आणि ह्यालाच **शालिवाहन** असेंही म्हण-

---

१ कथासरित्सागर. ( २–८ ).

तात. ह्या काव्यांचें गौरव बाणासारख्या कविपुंगवानें देखील विशेष रीतीनें केलें आहे.

सांप्रतच्या म्युनिसिपालिटीसारखी स्थानिक स्वराज्याची अमूल्य संस्था[1] देखील त्यावेळीं होती. तेणेंकरून राजा व प्रजा यांच्यांत परस्पर प्रेमबंधन राहून, सर्वत्र शांतता असे. हेंच राज्याच्या बळकटीचें मूळ कारण होय. राज्याच्या बळकटीमुळें, प्रत्येकाच्या जीवितांचें व मालमत्तेचें उत्तम प्रकारें संरक्षण होई, आणि त्या कारणानें अखिल प्रजाजन संतुष्ट राही. ह्यावरून त्यावेळीं राज्याचा बंदोबस्त[2] चांगला होत होता असें दिसतें.

शांतता व बंदोबस्त,

परधर्म सहिष्णुतेविषयीं तर हिंदूंची अनादि काला-

---

1. A Nigamasabhà or town-corporation is also mentioned in one of ushwadatá'sNâsik inscriptions, which shows that something like Municipal institutions existed in those early days."

(History of the Dekkan).

2. If the rate of interest depends on the degree of security and bears an inverse ratio to the efficiency of Government, it appears that the country was well governed notwithstanding political revolutions.

(History of the Dekkan).

आणि परधर्म सहिष्णुता.

पासूनच ख्याति आहे. त्याप्रमाणें अंध्रभृत्यांच्या कारकीर्दींत, **ब्राह्मण** धर्माप्रमाणेंच **बौद्ध** धर्म देखील चांगला भरभराटीच्या स्थितींत होता; आणि राजेरजवाड्यांचा दोन्ही धर्मांस उत्तम प्रकारचा आश्रय असे. **गोतमीपुत्र** राजाचा अशा प्रकारचा दोहोंसही आश्रा असल्याविषयीं, तत्कालीन शिलालेखावरून कळून येतें.[1]

---

# आभीर व राष्ट्रकूट राजे.

**अंध्रभृत्यांनंतर** सुमारें तीनशें वर्षेपर्यंतची जशी हवी तशी कच्ची हकीकत आपणांस अजूनही उपलब्ध होत नाहीं. तथापि, **मत्स्य** आणि **वायु** पुराणांवरून असें कळून येतें कीं, सदरहु राजांनंतर त्याच राजांच्या कुलांतील दुसऱ्या एका शाखेकडे **दक्षिणचें** प्रभुत्व सात पिढ्यापर्यंत, (ह्मणजे इ० स० २१८ पासून तों इ० स० ३०२ पर्यंत) होतें. तदनंतर **आभीर** नामक राजांनीं दहा पिढ्यांपर्यंत राज्य केलें, व ह्यांच्याच कारकीर्दीत **राष्ट्रकूट** राजांची सत्ता फैलावली असून, ती इ० सनाच्या पांचव्या शतकाच्या अखेरपर्यंत होती, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

आभीर, व राष्ट्रकुट राजे.

---

१ डा. रा. गो. भांडारकरकृत दक्षिणचा इतिहास.

# प्रथमचे चालुक्य राजे.

पहिले चालुक्य राजे, व त्यांचा काल.

राष्ट्रकूटानंतरचे दक्षिणचे राजे **चालुक्य** होत. ह्यांच्या उत्पत्तीची पौराणिक आख्यायिका जरा मनोवेधक असल्यामुळें ती **बिल्हण** कवीनें दिली आहे. ती अशी कीं, एके दिवशीं **ब्रह्मदेव** आपल्या प्रातर्विधींत निमग्न असतां त्याला **इंद्रानें** कळविलें कीं, पृथ्वीवरील मनुष्यें फार पापी व अगदीं कर्मभ्रष्ट झाल्याकारणानें, देवतादिकांस आपापले हविर्भाग मिळत नाहींत. त्यावेळीं अर्घ्यासाठीं केलेल्या हाताच्या चुळक्यांत **ब्रम्हदेवानें** पाहिलें. तदनंतर त्यांतून एक मोठा वीर पुरुष निघाला असून, त्यालाच **चालुक्य** कुलाचा आदिपुरुष समजतात. कारण, हा **चुलुक** ह्मणजे चुळक्यापासून उत्पन्न झालेला होय. पुढें कांहीं कालानें त्याच घराण्यांत **हारीत** आणि **मानव्य** नांवाचे नामांकित योद्धे जन्मले, व त्यांनीं आपलें कुल मोठ्या नांवारूपास आणिलें.

हे मूळचे **अयोध्येंतील** असून, ह्यांच्याच वंशांतले कांहींजण **दक्षिण** द्वीपकल्पांत गेले, व तेथें त्यांनीं स्वपराक्रमानें आपलें राज्य स्थापन केलें. ह्यांपैकीं पहिला व अति प्रसिद्ध **जयसिंह** होय. ह्यानें भोंवतालच्या सर्व मांडलिकांस पादाक्रांत करून, **दक्षिणेंत** आपली गादी स्था-

पिली, आणि तो सर्व देश आपल्या कबज्यांत आणिला. त्याच्यामागून **रणराग** हा गादीवर बसला असून, तोही मोठा शूर व धिप्पाड पुरुष होता. ह्याच्या पश्चात् ह्याचा मुलगा **पुलकेशि** हा सिंहासनारूढ झाला. व त्यानें आपलें आयुष्य ऐहिक आणि पारमार्थिक हित संपादन करण्यांत घालविलें. त्यानें आपली राजधानी **वातापिपुर**[1] येथें स्थापिली, व मोठ्या समारंभानें **अश्वमेध** केला. ह्याच्यामागें ह्याचा मुलगा **कीर्तिवर्मा** गादीवर बसला, व त्यानें इ० स० ५६७ पासून तों इ० स० ५९१ पर्यंत राज्य केलें. ह्यानें **नल** नामक राजांस, तसेंच **मौर्य**[2] आणि **कदंब**[3] राजांस जिंकिलें होतें.

**कीर्तिवर्मा** वारला, तेव्हां त्याचे मुलगे फारच लहान असल्या कारणानें, त्याचा भाऊ **मंगलीश** गादीवर बसला. त्यानें **कलचुरि**[4] नामक राजांस जिंकून, आपला विजयध्वज पूर्व पश्चिम समुद्रापर्यंत फडकाविला. परंतु त्याच्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांत त्याची दानत आणि नीति बिघडली जाऊन, आपल्या पुतण्यांस गादी न मिळतां आपल्या पुत्रासच

---

१ हें कलादगी जिल्ह्यांतील बादामी गांव होय.

२ हे उत्तरकोंकणांतील मांडलिक राजे असावेत.

३ हे उत्तर कानडांतील बनवासी येथील राजे होत.

४ हे राजे चेदि देशावर राज्य करीत असून, त्यांच्या राजधानीचें नगर तेवुर किंवा त्रिपुर होतें. हें जबलपुरानजीक असल्याचें कळून येतें.

ती मिळावी, एतद्विषयीं तो विलक्षण कृष्ण कारस्थानें करूं लागला. तथापि, **कीर्तीवर्म्या**चा पुत्र जो **पुलकेशि** ह्याच्या शौर्यानें व दूरदृष्टीनें, तीं सर्व निष्फळ होऊन, शेवटीं तीं **मंगलीशा**च्या राज्यहानीस आणि जीवितनाशास मात्र कारणीभूत झालीं. ह्यानें इ० स० ५९१ पासून इ० स० ६११ पर्यंत राज्य केलें.

ह्याच्यामागून **पुलकेशि** गादीवर बसला. हा पहिल्या **पुलकेशी**चा नातू होय. हा बहुत शूर व पराक्रमी होता. हा गादीवर बसला, तेव्हा **तो** अल्पवयी आहे अशी संधी पाहून, त्याच्या शत्रूंनीं व मांडलीक राजांनीं त्याच्यावर चोहोंबाजूनीं एकदम गर्दी केली. परंतु स्वतंत्र होण्याचा हा त्यांचा प्रयत्न बिलकुल सिद्धीस गेला नाहीं. कारण, ह्या दुसऱ्या **पुलकेशीनें** आपल्या निवडक फौजेनिशीं सर्वांवर हल्ला करून त्या सर्वांची खोड मोडली. प्रथम **राष्ट्रकूट** राजाचा समाचार घेऊन, त्यानें आपला मोर्चा **कदंब** राजाकडे फिरविला, आणि त्याच्या राजधानीचें शहर **बनवासी** सर केलें. तदनंतर **चेरी**[1] व **अलूप**[2] देशाचे राजे त्याच्याशीं मित्रत्वानें वागूं लागले. पुढें, **कोंकण**च्या **मौर्य** राजावर त्यानें स्वारी केली, आणि त्यास पादाक्रांत करून पश्चिमसमुद्रांतील त्याचेंच **पुरी**नामक सुप्रसिद्ध शहर

---

१ हा सांप्रतचा म्हैसूर प्रांत असावा.

२ ह्याच्या ताब्यांत मलबार प्रांत होता.

घेतलें. ह्यालाच **पश्चिमसागरांतील लक्ष्मी** अशी संज्ञा होती. त्यावरून तें त्याकाळीं पश्चिम समुद्राचें नाकें होतें, यांत संशय नाहीं. तदनंतर **पुलकेशीनें लाट, माळवा,** आणि **गुर्जर** देशांतील राजांवर हल्ला करून, त्यांस त्यानें आपलें मांडलिक बनविलें. आणि आपला दरारा सर्वत्र बसविला.

ह्याच वेळीं, **उत्तरहिंदुस्थानांत हर्षवर्धन** नामक एक बलाढ्य राजा राज्य करीत होता. ह्याची गादी **कनोज** येथें असून, तो त्या देशाचा चक्रवर्तीच होता. **नर्मदा** नदीच्या दक्षिणेस आपली सत्ता असावी असें त्याच्या मनांत येऊन, ती वाढविण्यासाठीं त्यानें बहुत यत्न केले. परंतु **पुलकेशीनें** त्याचें यत्किंचितूही चालूं दिलें नाहीं, आणि त्याच्या सैन्याचा पराभव केला. पुढें, ह्यानें आपल्यास **परमेश्वर** ह्मणजे **चक्रवर्ती** असा किताब घेतला.

**पुलकेशि** हा अतिशय शूर आणि राजकार्य धुरंधर होता. त्यामुळें सर्व राजेरजवाडे त्यास भिऊन असत. **कोसल**[1] आणि **कलिंग**[2] देशाचे राजे तर त्याच्या तापामुळें संत्रस्त होऊन, त्यांस शरणही गेले. तदनंतर त्यानें **कांचीपुरा**[3]वर मोठ्या सैन्यानिशीं हल्ला केला, आणि

---

१ हा देश विंध्याचलानजीक होता.

२ हा सांप्रतचा उत्तरसरकार नांवाचा प्रांत होय.

३ हल्लींचें कांजीवरम्.

तें शहर घेतलें. पुढें **कावेरी** नदी उतरून त्यानें **पांड्य**, **चोल**, आणि **केरळ** देशावर हल्ला केला. परंतु तेथील राजे त्यास शरण गेल्या कारणानें तो त्यांच्याशीं मित्रत्वानें वागूं लागला.

अशा प्रकारें **पुलकेशी**च्या कीर्तीचा परिमल चोंहोकडे पसरला, आणि **भरतखंडां**त व अन्य देशांतही त्याची बहुत तारीफ होऊं लागली. **चीन** देशांतील प्रसिद्ध **बुद्ध** मुशाफर **हूणसंग**[१] हा ह्या राजाच्या कारकीर्दीतच **हिंदुस्थानां**त आला असून तो **पुलकेशी**च्या शौर्याचें आणि बलाचें फार वर्णन करितो. एका **आरबी** ग्रंथांत असें लिहिलें आहे कीं **इराण**चा राजा जो दुसरा **खुसरू**[२] ह्याच्या दरबारीं **पुलकेशी**चा वकील[३] असून, **पुलकेशी**च्या दरबारीं देखील **खुसरू**चा वकील होता. याप्रमाणें **चालुक्य** घराण्यांतील राजांपैकीं, ह्या दुसऱ्या **पुलकेशी**चा अम्मल, राज्यविस्तार, आणि कीर्ति विशेष फैलावलेली होती. ह्यानें इ० स० ६११ पासून इ० स० ६३४ पर्यंत राज्य केलें.

**पुलकेशी**ला १ चंद्रादित्य, २ विक्रमादित्य, ३ **जयसिंह**-वर्मा, आणि ४ आदित्यवर्मा, असे चार मुलगे होते. त्यांपैकीं, दुसरा मुलगा लाडका ( **प्रियतनय** ) असल्यामुळें, तो

---

१ हा इ० स० ६३९ सालीं महाराष्ट्र देशांत आला होता.
२ ह्यानें इ० स० ५९१ पासून इ० स० ६२८ पर्यंत राज्य केलें.
३ हा वकील इ० स० ६२६।२७ सालीं इराणांत गेला असावा.

त्याच्यामागून गादीवर बसला. ह्याच्या कारकीर्दीत **कांची** **चोल**, **पांड्य**, आणि **केरल**, इत्यादि देशांच्या राजांनं जरासा पुंडावा करून आपली डोई वर केली होती. परं **विक्रमादित्यानें** त्या सर्वांस चीत् करून, त्यांचा वृथा दर्प नाहींसा केला. ह्यानें इ० स० ६३४ पासून इ० स० ६८० पर्यंत राज्य केलें.

**विक्रमादित्याचे** दुसरे तिघे बंधु राजप्रतिनिधि यानात्यानें, निरनिराळ्या प्रांतांत राज्य करीत होते. **चंद्रादित्याच्या** ताब्यांत **सावंतवाडी** प्रांत होता. **आदित्यवर्म्याच्या** हस्तगत **कृष्णा** आणि **तुंगभद्रा** या नद्यांच्या संगमाजवळचा प्रांत होता. व **जयसिंहवर्मा** हा **लाट** प्रांतावर आपला अम्मल चालवीत असे. **लाट** देश ह्मणजे सांप्रतचा **गुजराथ** प्रांत असून, **विक्रमादित्याच्या** कारकीर्दीत, **चालुक्य**–घराण्यांतील एक शाखा येथेंच स्थापन झाली होती.

**विक्रमादित्यानंतर** त्याचा मुलगा **विनयादित्य** गादीवर बसला. हा मोठा शूर, पराक्रमी, व मुत्सदी असे. ह्यानें आपल्या बापाच्या कारकीर्दीत शत्रूंचें निर्मूलन करण्यांत व देशाची शांतता राखण्यांत, अतिशय मेहनत घेतली असून, त्यानें आपल्या पित्याची मर्जी संपादन केली होती. त्यामुळेंच पुढें **पल्लव**, **कळंभ्र**, **केरल**, **हैहय**, **विल**, **मालव**, **चोल**, **पांड्य**, इत्यादि देशांच्या राजांस

त्यानें आपले दोस्त केले, आणि कावेर, पारसीक[1], व सिंहल, इत्यादि राजांस त्यानें आपले मांडलीक बनविले. ( इ० स० ६९२ व इ० स० ६९५ ).

विनयादित्यानें इ० स० ६८० पासून इ० स० ६९६ पर्यंत राज्य केलें, आणि उत्तरहिंदुस्थांतील चक्रवर्ती राजाचा पराभव करून, सार्वभौम पदाचीं सर्व चिन्हें[1] त्यानें धारण केलीं.

तदनंतर त्याचा पुत्र विजयादित्य गादीवर बसला, व त्यानें इ० स० ६९७ पासून इ० स० ७३३ पर्यंत राज्य केलें. ह्याच्यामागून त्याचा मुलगा जो दुसरा विक्रमादित्य, तो सिंहासनारूढ झाला, व त्यानें लागलींच आपला मोर्चा पल्लव, चोल, पांड्य, केरल, कलभ्र, इत्यादि प्रांतांच्या राजांकडे फिरवून, त्यांस जमीनदोस्त केलें. पुढें, त्याच्या राणीनें ह्या जयघोषप्रीत्यर्थ, व कांचीच्या राजाचा पराभव झाला एतदर्थ, कलादगी जिल्ह्यांत पट्टडकल येथें स्मारक म्हणून एक देवालय बांधिलें. ह्या राजानें चौदा वर्षें, म्हणजे इ० स० ७४७ पर्यंत राज्य केलें.

---

१ हे मलबार किनाऱ्यावर वसलेले सिरिअन् लोक असावेत.

१ हीं चिन्हें म्हटलीं म्हणजे पालिध्वज नांवाचा जरीपटका, व ढक्का नांवाची नौबत, इत्यादि होत.

# राष्ट्रकूट राजे.

राष्ट्रकूट राजे व त्यांचा काल.

दुसऱ्या विक्रमादित्यानंतर त्याचा मुलगा जो दुसरा कीर्तिवर्मा हा राज्य करूं लागला. ह्याच्या कारकीर्दीत चालुक्यांचें महाराष्ट्र देशांतील प्रभुत्व नष्ट होऊन, दक्षिणापथांतील सत्ता त्यांच्याकडून राष्ट्रकूटांच्या हातीं गेली. ही महाराष्ट्रांतील चालुक्यांची सत्ता इ० स० ७५३ च्या पूर्वी लयास गेली, व ती राष्ट्रकूट कुलांतील राजांपैकीं प्रथम दंतिदुर्ग राजानें छिनावून घेतली, आणि तदनंतर तिचा शेवट कृष्ण नामक राजानें केला. हें दक्षिणचें सार्वभौमत्व राष्ट्रकूट कुलांत इ० स० ७५३ पासून इ० स० ९७२ पर्यंत, म्हणजे सुमारें २१९ वर्षें राहिल्यानंतर, चालुक्य घराण्यांतील राजे पुनश्च स्वस्थानापन्न झाले.

राष्ट्रकूट राजांची पिढी दंतिवर्म्यापासून सुरू होते. ह्याचा पुत्र इंद्रराज असून, इंद्राचा पुत्र गोविंद, व गोविंदाचा पुत्र कर्क होय. कर्क राजानें वैदिक धर्मास पुष्कळच आश्रय दिला होता. त्यामुळें सर्व ब्राम्हण यज्ञयागादि क्रिया पुष्कळ करीत. कर्काचा मुलगा दंतिदुर्ग असून, त्यानें थोडक्या फौजेनिशीं कर्नाटक घेतलें, व

कांची, कलिंग, कोसल, श्रीशैल[1], माळव, लाट, आणि टंक, या देशांच्या राजांस पराजित केलें. तदनंतर त्यानें उज्जयनीस जाऊन, सोनें व जवाहीर हें उमाप धर्मार्थ वाटलें.

दंतिदुर्गानंतर त्यांचा चुलता कृष्ण हा गादीवर बसला. ह्यालाच शुभतुंग अशी संज्ञा होती. ह्यानें चालुक्यांचें अजिबात निर्दलन करून, दक्षिणचें सार्वभौमपद मिळविलें. ( इ० स० ७५३ ). एलापूर[2] येथील नामांकित खोदींव कामें, आणि पर्वतांतील अप्रतीम शिलामंदिरें, हीं कृष्णराजाच्या कलाभिरुचीचींच फलें होत.

कैलास नांवाचें सर्वोत्तम देवालय कृष्णराजानेंच बांधलें असून, त्यानें इ० स० ७५३ पासून ७७५ पर्यंत राज्य केलें.

---

१ हें मद्रास इलाख्यांतील कर्नुल जिल्ह्यांतलें ठिकाण असून, येथें मल्लिकार्जुनाचें स्थान आहे.

२ एलापूरचाच एलूर हा अपभ्रंश असून, त्याचें सांप्रत वेरूळ हें रूप झालें आहे. ह्या स्थलाच्या संबंधानें वटोदर ताम्रपत्रांत असा उल्लेख आहे कीं, 'एलापुरच्या पर्वतावर कृष्णराजानें अद्भुत सौंदर्यानें मंडित, आणि अनेक चमत्कृतींनीं विभूषित, असें एक मनोहर देवालय निर्माण केलें आहे. जेव्हां विमानांत बसून देवगण नभोमंडलांत संचार करीत, तेव्हां हें देवालय पाहून त्यांस अत्याश्चर्य वाटे; आणि ते आपल्याच

( पुढें चालू )

**कृष्ण** राजानंतर त्याचा मुलगा दुसरा **गोविंद** गादीवर बसला, आणि त्याच्यामागून **गोविंदाचा** धाकटा भाऊ **ध्रुव** ह्यास राज्याभिषेक झाला. हा राजा फार शूर असे, व त्यामुळें त्याला **निरुपम, कलिवल्लभ,** आणि **धारावर्ष,** अशीं नांवें असत. ह्यानें **कांचीच्या पल्लव** राजास जमीनदोस्त करून, त्याला खंडणी द्यावयास लाविलें. तसेंच, **गंग** कुलांतील जे राजे **चेरा** देशावर राज्य करीत होते, त्यांसही त्यानें कैद केलें. तदनंतर, त्यानें आपला विजयध्वज **उत्तर हिंदुस्थानांत** फडकावीत नेऊन, **वत्सदेशाच्या** राजास **मारवाडांत** पळ काढावयास लाविलें,

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

मनाशीं विचार करीत कीं, हें श्रीशंकराचें स्वयंभूच स्थान आहे. कारण, इतकी रमणीयता मानवीकलेंत कधींही दृष्टिगोचर होत नाहीं. ज्या शिल्पकारानें त्या देवालयाची रचना केली, त्याला देखील सदरहू मंदिराच्या चमत्कृतीविषयीं आश्चर्य आणि नवल वाटे. व अशी अपूर्वकृति पुनश्च उठविण्यांत आपले प्रयत्न विफल झालेले पाहून, तो शिल्पकार तत्संबंधीं साशंक होई. गंगाप्रवाह, शशांक, व हलाहल, इत्यादि अलंकारांनीं त्या देवालयांतील शंकर स्वयमेव विभूषित असतांही, कृष्णराजानें त्याला सुवर्णानें, मरकतमण्यांनीं, आणि इतर अमूल्य रत्नांनीं मंडित केला होता.'

१ ह्याची राजधानी कौशांबी असावी असें वाटतें. प्रयागानजीकचें सांप्रतचें जें कोसमगांव, तेंच हें होय.

आणि **गौडदेशाच्या** राजास जिंकून जीं राजछत्रें त्याजपासून त्यानें छिनावून घेतलीं होतीं, तींच **ध्रुवराजानें वत्सदेशाच्या** राजापासून उपटून आणिलीं.

**ध्रुवनिरुपमानंतर** त्याचा मुलगा जो तिसरा **गोविंद** तो गादीवर बसला. ह्यालाच पहिला **जगत्तुंग** असें ह्मणत. हा फारच शूर व पराक्रमी असल्यामुळें, ह्याच्या कारकीर्दीत **राष्ट्रकूट** कुलांतील राजे अगदीं अजिंक्य झाले होते. हा गादीवर बसल्यावर अजूबाजूच्या लहान मोठ्या एकंदर बारा राजांनीं एकसंप करून, ह्याची सत्ता अजिबात नाहींशी करण्याचें योजिलें. परंतु **जगत्तुंगानें** त्या सर्वांचा चांगला खरपूस समाचार घेतला, आणि त्यांजला दांतीं तृण धरावयास लाविलें. तदनंतर त्यानें **उत्तरहिंदुस्थानांत**, व **दक्षिणेंत रामेश्वरपर्यंत** स्वारी करून, आपलें सार्वभौमत्व स्थापिलें, आणि सर्व राजांस खंडणी द्यावयास लाविलें. ( शके ७२६ म्हणजे इ० स० ८०४ ). हा इतका बलिष्ट झाला होता कीं, तो हवा त्यास राजा बनवी, आणि पाहिजे त्यास पदच्युत करी.

**जगत्तुंगानंतर**, पहिला **अमोघवर्ष** गादीवर बसला. ह्याचें खरें नांव म्हटलें ह्मणजे **शर्व** होय. ह्याच्या राज्याची

---

१ डा. भांडारकर कृत दक्षिणचा इतिहास पहा.

" Govinda III, as stated in the Baroda grant, made and unmade kings ".

राजधानी **मान्यखेत** असून, तेंच सांप्रतचें **मालखेड** नांवाचें गांव होय. हें **निजाम**च्या राज्यांत आहे.

तदनंतर दुसरा **कृष्ण** ( अकालवर्ष ), दुसरा **जगत्तुंग**, तिसरा **इंद्र**, दुसरा **अमोघवर्ष**, चवथा **गोविंद**, **बद्दिग** किंवा तिसरा **अमोघवर्ष**, तिसरा **कृष्ण** ( अकालवर्ष ), **खोटिक**, आणि **कक्कल** ( दुसरा कर्क किंवा ज्याला **चवथा अमोघवर्ष** म्हणतात तो ), असे अनुक्रमें गादीवर बसले. ह्या **राष्ट्रकूट** घराण्यांतील शेवटला राजा **कक्कल** मोठा शूर होता; तथापि, **चालुक्य** घराण्यांतील **तैलप** नामक वीरानें एका लढाईत त्याचा पराभव केल्यामुळें, **दक्षिण**चें साम्राज्य पुनश्च **चालुक्यां**च्या हातीं गेलें. ( शके ८९९, इ० स० ९७३ ). याप्रमाणें, **दक्षिण**चीं राज्यसूत्रें **राष्ट्रकूट** राजांच्या हातीं, सुमारें सव्वा दोनशें वर्षें होतीं. ( इ० स० ७४८ ते इ० स० ९७३ ). हे राजे फार धर्मनिष्ट व विद्येचे पोषिंदे होते.

## नंतरचे चालुक्य राजे.

नंतरचे चालुक्य राजे.

**कक्कला**चा पराभव केल्यावर **तैलपा**नें आपला मोर्चा **दक्षिणहिंदुस्थान** व **उत्तरहिंदुस्थाना**कडे फिरवून, **चेदी** आणि **मालव** देशांच्या राजांस जिंकिलें. ह्यानें शके ८९५ पासून शके ९१९ पर्यंत राज्य केलें.

त्याच्या पाठीमागून त्याचा मुलगा **सत्याश्रय** गादीवर बसला, आणि तदनंतर पहिला **विक्रमादित्य** व **जयसिंह** हे अनुक्रमें सिंहासनारूढ झाले. **जयसिंह** हा मोठा पराक्रमी असे. त्यानें **चोल, चेर, मालव, सप्त कोंकण,** इत्यादि प्रदेश काबीज केले होते. हा शके ९३० सालीं गादीवर बसला, आणि शके ९६२ त मरण पावला.

**जयसिंहा**नंतर त्याचा मुलगा पहिला **सोमेश्वर** गादीवर बसला, व त्यानें **आहवमल्ल** आणि **त्रैलोक्यमल्ल** असा किताब धारण केला. ह्यानें **उत्तर हिंदुस्थानांत** आणि **दक्षिण हिंदुस्थानांत** स्वाऱ्या करून, **कान्यकुब्ज** ( **कनोज** ), **मालव** ( माळवा ), **चोल** ( **द्रविड** ), या देशांतील राजांस जिकून, त्यांस अरण्याची वाट पकडावयास लाविलें. **कल्याण** शहर यानेंच वसविलें, व तेथें त्यानें आपली राजधानी केली.

**आहवमल्ला**ला तीन पुत्र होते. पहिल्याचें नांव **सोमेश्वर**, दुसऱ्याचें **विक्रमादित्य,** आणि तिसऱ्याचें **जयसिंह**. ह्या सर्वांत **विक्रमादित्य** हा विशेष प्रतापी व शूर असल्यामुळें, त्यालाच **युवराज** बनवून आपल्या गादीचा मालक करण्याचें **आहवमल्ला**नें योजिलें होतें. परंतु **विक्रमादित्या**नें आपल्या मनाचा मोठेपणा दाखवून, ती गोष्ट त्यानें नाकारली. तथापि, राज्याचें सर्व धूरीणत्व त्याच्याचकडे असे, आणि युद्धांत किंवा संग्रामांत उभें

राहून लढण्याचें काम, तोच आपल्या शिरावर घेऊन करीत असे. त्यानें चोल देशाच्या राजास हाकून लाविलें. माळव्याच्या राजाचे जे शत्रू होते त्यांस जिंकून दातीं तृण धरावयास लाविलें, आणि त्या राजास पुनश्च गादीवर बसविलें. त्यानें गौड ( बंगाल ) व कामरूप ( आसाम ), या दोन्ही देशांवर स्वारी करून, तेथें त्यानें आपला विजयध्वज फडकाविला. तदनंतर त्यानें आपला मोर्चा दक्षिणेकडे फिरविला, आणि केरल, चोल, व सिंहल देश सर करून, त्या देशांच्या राजांचा पाडाव केला, आणि गंगकुंड, कांची, वेंगी[1], व चक्रकोट, हीं शहरें घेतलीं.

याप्रमाणें, एकामागून एक असे अनेक देश काबीज करण्यांत विक्रमादित्य गुंतला असतां त्याचा बाप आहवमल्ल हा एकाएकी विशेष ज्वर येऊन फार आजारी पडला. त्यावेळेस आपला अंत समीप येऊन ठेपला असें पाहून, त्यानें अतोनात धर्म केला, आणि तुंगभद्रा नदींत शिरून जलसमाधि घेतली. ( शके ९९१ ह्मणजे. इ० स० १०६९ ).

ह्या राजानें पुष्कळ यज्ञ केले असून, तो मोठा धर्मनिष्ठ व विद्येचा पोषिंदा असे. तो विद्वान लोकांची चांगली संभावना करी, आणि त्यामुळें गुणीजन त्याचे गुण गात.

---

१ कृष्णा आणि गोदावरी नद्यांच्या खालच्या प्रवाहाच्या दरम्यानचा हा प्रदेश होय.

आहवमल्लानंतर त्याचा वडील मुलगा दुसरा **सोमेश्वर** गादीवर बसला. ह्याच्या अंगांत कर्तृत्वशक्ति बिलकुल नसून, तो प्रजेचा फार छल करी. त्यामुळें, **विक्रमादित्याचें** व ह्याचें, अपसांत बनेनासें झालें. सबब, **जयसिंहाला** घेऊन, **विक्रमादित्य** मोठ्या सैन्यानिशीं त्या राजधानींतून निघाला. परंतु, ही गोष्ट राजा **सोमेश्वराला** न आवडल्या कारणानें, त्यानें आपल्या धाकट्या भावाच्या पाठीवर सैन्य पाठविलें. पण त्याची **विक्रमादित्यानें** अगदीं कत्तल उडाविली, आणि **तुंगभद्रेच्या** वाटेनें त्यानें आपला मोर्चा **चोल** देशाकडे फिरविला. मार्गांत **कोंकण**चा राजा **जयकेशी**[1] त्यास शरण आल्यावरून, त्याच्याशीं त्यानें सख्यत्व ठेविलें, आणि कालांतरानें, त्यानें आपली **मल्लमहादेवी** नांवाची मुलगी देखील त्याच्या नातवाला पाणिग्रहणार्थ दिली.

**कोंकण**च्या राजानें आपली प्रणति आणि नम्रता दर्शविल्यावर, **विक्रमादित्यानें अलुप**[2], **केरल**[3], व **चोल**[4] देशांवर स्वारी केली. परंतु तेथील राजे देखील त्यास शरण आले, आणि **चोल देशाच्या** राजानें तर आपली

१ जयकेशीची राजधानी गोपकपट्टण, म्हणजे गोवें, येथें होती.

२ हें मलबार किन्याऱ्यावरील सांप्रतचें अलुपै गांव होय.

३ मलबार.

४ द्रविड देश.

कन्याही त्यास पाणिग्रहणार्थ दिली. पुढें **चोल** देशाचा राजा वारल्यावर, तेथें मोठी गडबड व धामधूम सुरू झाली, आणि अशी संधी पाहून **वेंगी**चा राजा जो **राजिग** ह्यानें देखील **विक्रमादित्यावर** चाल करून येण्यास, त्याचा थोरला भाऊ राजा **सोमेश्वर** यास फूस दिली, आणि **चोल**च्या राजास पदुच्युत करून आपणच त्याची गादी बळकाविली. परंतु इतकेंही झालें तथापि, **विक्रमादित्य** डगमगला नाहीं. त्यानें एकदम त्या दोघांवर चाल केली, आणि मोठ्या निकरानें व धैर्यानें लढून, त्यांची अगदीं दाणादाण करून टाकिली. त्यासमयीं **राजिग** राजा युद्धांतून पळून गेला. आणि **सोमेश्वर** हस्तगत झाला. तदनंतर **विक्रमादित्यानें** आपल्या वडील भावास पदच्युत केलें, व आपण सिंहासनारूढ झाला, आणि आपला धाकटा भाऊ जो **जयसिंह** ह्यास **बनवासी** प्रांत दिला ( शके ९९८. इ. स. १०७६ ).

पुढें कांहीं वर्षांनीं **जयसिंहा**ला देखील कुबुद्धि होऊन त्यानें आपला भाऊ जो **विक्रमादित्य** ह्याच्याशीं निमकहरामपणा केला, आणि तो त्याच्या राज्यांत फंदफितुरी करावयास लागला. ही गोष्ट **विक्रमादित्या**ला कळतांच त्यानें त्याची पुष्कळ कानउघाडणी केली. परंतु ती सर्व व्यर्थ गेली. इतकेंच नाहीं तर, **जयसिंह** उलट त्याची अव हेलना करूं लागला, व त्याच्याशी लढण्यासही सिद्ध

झाला. अशा प्रकारें इतकी गोष्ट हातघाईस आल्यावर, **विक्रमादित्यानें** त्याजवर स्वतः चाल केली, व त्याचा पराभव करून त्यास अगदीं पळ काढावयास लाविलें. पुढें **जयसिंह** जंगलांत लपत असतां पकडला गेला, आणि राजाच्या हातीं सांपडला. तथापि **विक्रमादित्यानें** त्यास सर्व अपराधांची क्षमा केली.

**विक्रम** कारकीर्दीच्या उत्तरार्धांत, त्याच्या राज्यावर **यादव** कुळांतील **होय्सळ** नामक राजपुत्रानें स्वारी केली. हा राजपुत्र **द्वारसमुद्र**[1] येथें राज्य करीत होता; व अशा प्रकारें विनाकारण कुरापत काढून स्वारी करण्यांत त्याला **पांड्य, गोवें,** आणि **कोंकण,** या देशांच्या राजांची चांगली मदत होती, म्हणूनच त्यानें असें साहस केलें. तथापि, आलेल्या प्रसंगाला न जुमानतां, **विक्रमादित्यानें** नेहेमींप्रमाणें धैर्य धरून त्या सर्वांची पिछेहाट करण्यासाठीं, आपला **आच**[2] नांवाचा **दक्षिण** प्रदेशस्थ **मांडलिक** त्याला त्यांजवर पाठविला. हा फारच शूर आणि रणधुरंधर असल्यामुळें त्यानें **होय्सळांस**[3] दातीं तृण धरावयास लावून **गोवें** सर केलें; **पांड्य** राजाचा पाठलाग करून **मलपांची** धुळधाण उडविली; **कोंकणावर** छापा घालून तें

१ हें सांप्रतचें हळेबीड असून, तें म्हैसूर इलाख्यांत आहे.

२ त्याला आचगि असेंही म्हणत.

३ त्यालाच पोय्सळ अशी देखील संज्ञा होती.

आपल्या ताब्यांत घेतलें; आणि अनेक लढाया मारून **कलिंग, वंग, मरु, गुर्जर, मालव, चेर,** व **चोल,** येथील राजांस पादाक्रांत केलें, व त्यास **विक्रमादित्या**-च्या ताब्याखालीं आणिलें.

**चोल** राजा अति उन्मत्त झाल्यामुळें, खुद्द **विक्रमादित्या**ला देखील, त्याजवर स्वारी करणें भाग पडलें, आणि त्या कारणानेंच, **चोल** राजाला पुढें पळूनही जावें लागलें.

**विक्रमादित्या**च्या कारकीर्दींत पुष्कळ शांतता असून, सुरक्षितपणा तर इतका असे कीं, त्याची प्रजा आप-आपल्या घराचीं दारें सदैव उघडीं टाकी, आणि त्यांत चोरांच्या ऐवजीं सीतल अशा चंद्रकिरणांचाच निरंतर प्रवेश होई. तो आपल्या प्रजेचें पालन उत्तम प्रकारें करी, व त्यामुळेंच त्याची प्रजा त्याच्या अमलाखालीं सुखी आणि संतुष्ट असे.

ह्या राजानें आपल्या नांवाचें एक मोठें नगर वसवून, **विष्णू**चें प्रचंड देवालय बांधिलें, व त्याच्या समोर एक तलाव खंटला. हा विद्येचा मोठा पोषिंदा असे, व तो विद्वान लोकांस आणि पंडितांस चांगला आश्रय देई. **बिल्हण** नामक पंडित केवळ आश्रयासाठींच सर्व **भरत**-

---

१ बिल्हणकृत विक्रमार्क चरित.

२ हा काश्मीरचा राहणारा होता.

**खंड**भर फिरला. तथापि, त्याची कोणीही विचारपूस केली नाहीं. परंतु **विक्रमादित्याच्या** दरबारीं तो येतांच, त्याचें चांगलें आगतस्वागत होऊन, त्याला **विद्यापति** ही पदवी मिळाली. **विज्ञानेश्वर**[1] हा देखील ह्या राजाच्या कारकीर्दींतच उदयास आला होता. एकंदरींत, ह्या राजाची कारकीर्द[2] सुखावह व समृद्धिकारक होती, असें म्हणण्यास बिलकुल हरकत नाहीं. ह्यानें पन्नास वर्षें राज्य केलें.

दुसऱ्या **विक्रमादित्यानंतर**, त्याचा पुत्र तिसरा **सोमेश्वर** हा शके १०४८ ( इ० स० ११२७ ) मध्यें गादीवर बसला. ह्यानें **भूलोकमल्ल** असा किताब धारण केला होता. हा स्वतः मोठा विद्वान असल्यामुळें पंडितजन

---

१ हा मिताक्षरेचा कर्ता असून, तो ग्रंथ धर्म व स्मृति विषयांत, बहुतेक अखिल भरतखंडभर, व विशेषतः महाराष्ट्रांत, अगदीं प्रमाण असा मानितात. विज्ञानेश्वर कल्याण मुक्कामीं राहत असे.

2. From this and from the description given by Bilhana, as well as from Vikramaditya's inscrip tions, of which we have about two hundred it appears to be an undoubted fact that he was the greatest prince of this later chäluka dynasty, and that during his reign the country enjoyed happiness and prosperity."

(Early History of the Dekkan. By Dr. R. G. Bhandârkar.) P. 67,

त्याची फार स्तुति करीत, व तीस तो पात्रही असे. ह्याच्या विद्वत्तेमुळें ह्याला **सर्वज्ञभूप** अशी पदवी मिळाली होती. **मानसोल्हास** अथवा **अभिलषितार्थ चिंतामणि** नांवाचा ग्रंथ, ह्या राजानेंच केलेला होय. ह्या पुस्तकाचें पांच भाग असून, त्यांत अनेक प्रकारच्या विषयांची माहिती दिलेली आढळते. पहिल्या भागांत १ राज्यसंपादना-विषयींचें प्रतिपादन असून, त्यांत मुख्यत्वेंकरून असत्याचा त्याग, परपीडानिवृत्ति, दम, औदार्य, मार्दव, ईश्वरोपासना, अपंगांस मदत, बुभुक्षितांस अन्नदान, व इष्टमित्र, आप्त, आणि स्वकीयजनांस साहाय्य, इत्यादींचा विचार केला आहे. दुसऱ्या भागांत २ राज्यसंरक्षणाविषयीं सांगितलें असून, त्यांत राज्याचीं जीं मुख्य सात अंगें, ह्यांचा विचार केला आहे. हीं सात अंगें म्हटलीं म्हणजे १ सर्वगुणसंपन्न राजा, २ मंत्री, ३ पुरोहित, ४ ज्योतिषी, ५ भांडार( ख-जिना ), ६ तो सदैव भरपूर राखण्याचीं साधनें, आणि ७ सैन्य, हीं होत. तिसऱ्यांत ३ राजक्रीडेचे प्रकार, म्हणजे मनोहर भुवन, अभ्यंग स्नान, तैलादि सुवासिक पदार्थांचा उपभोग, उत्तम वस्त्रें, आणि नानाप्रकारचे शृंगार, वगैरे सांगितले आहेत. चौथ्यांत ४ मनोरंजनाचे मार्ग सांगितले असून, त्यांत युद्धकौशल्य, वाजकिरण, हस्तिचोदनचातुर्य, मल्लयुद्ध ( कुस्त्या ), कोंबड्यांची लढाई, शिकारीकरितां कुत्रें तयार करणें, काव्य, गीत, वाद्य, नृत्य, इत्यादिकांचा

समावेश केला आहे. पांचव्या भागांत व्यायामाविषयींचें विवेचन आहे, व त्यांत मुख्यवेंकरून उद्यानक्रीडा, शैल-क्रीडा, मैदानांत खेळणें, युवतिजनांच्या साहचर्याची करमणूक, इत्यादि प्रकार सांगितले आहेत. हा ग्रंथ शके १०५२ ( इ०स० ११३१ ) सालीं तयार झाला असावा.

हा राजा शके १०६० ( इ० स० ११३८ ) सालीं मरण पावल्यावर, त्याचा मुलगा **जगदेकमल्ल** गादीवर बसला. ह्यानें बारा वर्षें राज्य केलें, व ह्याच्या मागून ह्याचा भाऊ जो दुसरा **तैलप** तो गादीवर बसला. ( शके १०७२ ). ह्या दोन्ही राजांच्या कारकीर्दींत **चालुक्यांचें** बल उत्तरोत्तर क्षीणच होत जाऊन, सरते शेवटीं **कलचुरि** घराण्यांतील **विज्जल** नामक साहसी पुरुषानें त्यांचा अगदींच पाडाव करून, **तैलपाची** गादी आपणच बळकाविली.

**विज्जल**[1] हा **तैलप** राजाच्या पदरीं **दंडनायकाच्या** हुद्यावर असे. त्यानें आपल्या राजाचें दौर्बल्य पाहून, तद्विरुध्द इतर **मांडलिकांचें** साहाय्य घेतलें, आणि शके १०८४ सालीं आपल्या प्रभूवर चाल केली. त्यावेळीं **तैलप**[2] हा **अन्निगेरि** येथें होता. परंतु त्याचें कांहीं एक चालेनासें झाल्यामुळें त्यानें **बनवासी**ची वाट धरली, व तदनंतर **विज्जलानें** आपणास राजा असा स्वतंत्र किताब धारण केला.

---

१ ह्यालाच विज्जण असेंही ह्मणत.

२ ह्याचें दुसरें नांव नुर्मडितैल किंवा त्रैलोक्यमल्ल असें असे.

शके १०८७ सालीं **तैलप** राजा मरण पावल्यावर, **चालुक्य** घराण्याचा अगदीं लोप झाल्यासारिखेंच झालें. परंतु दरम्यान लिंगायत पंथाचें प्राबल्य वाढल्यावर **विज्जल** हा ठार मारला गेल्यामुळें, **कलचुरि** शक्तिहीन झाले; आणि त्या वेळेसच **तैलपा**चा मुलगा जो चवथा **सोमेश्वर** ह्यानें आपल्या पूर्वजांचें बहुतेक राज्य पुनश्च काबीज केलें, व आपली गादी **अन्निगेरि** येथें स्थापिली. ( शके ११०४ ).

हें गतवैभव संपादन करण्याच्या कामीं **सोमेश्वराला** त्याच्याच कुळांतील **ब्रह्म** ( **बोम्म** ) नामक मांडलिकाची उत्तम प्रकारची मदत मिळाली होती. हा मांडलिक मोठा-शूर, बलवान, आणि साहसी असून, त्याची **सोमेश्वरावर** फारच भक्ति असे. त्यानें शत्रूंशीं अनेक लढाया मारल्या, एका हत्तीच्या योगानें साठ हत्ती जिंकिले, आणि **कलचुरीं**चा पराभव करून **चालुक्यांस** पुनश्च स्वस्थानापन्न केलें.[1]

तथापि, भवितव्यता कांहीं निराळीच असून, **चालुक्य** घराण्याचा अस्तच होण्याचा समय येऊन ठेपला होता. **यादव** कुळ दिवसानुदिवस उदयास येत चाललें,

---

1 "Bomma is represented in an inscription at Annigeri dated Saka 1106 to have destroyed the Kalachuris and restored the Chalukyas to the throne."

(Early H. of the Dekkan. By Dr. Bhandarkar) P. 69.

आणि त्यांतील तारे मधून मधून चमकू लागले. शेवटीं **वीर बल्लाळानें चालुक्यांचा** सेनाधिपति जो **बोम्म** त्याच्याशीं सामना केला. ह्यांत **बोम्माचा** पाडाव झाला, व **चालुक्यांची** सत्ता मावळली; आणि शके ११११ नंतर **सोमेश्वराचें** नाम मात्र अवशिष्ट राहिलें.

चालुक्यांच्या कारकीर्दींतील धर्मप्रसार, सामाजिक स्थिति, व भिन्न भिन्न स्मृतींचें एकीकरण.

**चालुक्यांच्या** कारकीर्दींत, **बौद्ध** व **जैन** धर्माचा प्रसार उत्तरोत्तर कमीच होत गेला; आणि त्याच्या ऐवजीं **पौराणिक** देवांचेंच महत्व दिवसानुदिवस वाढत चाललें. मध्यंतरीं **बसवानें** एक निराळाच पंथ काढिला, व **लिंगायत** धर्माची स्थापना केली. तथापि तो **ब्राह्मणी** धर्मासच अनुसरून असल्यामुळें, **ब्राह्मणी** धर्माची अवहेलना काडीमात्रही झाली नाहीं.

ह्यांच्याच कारकीर्दींत, **धारेश्वर, विज्ञानेश्वर, अपरार्क** इत्यादि निबंधकार, ह्मणजे धर्मशास्त्रावरील **विद्वान्** आणि प्रसिद्ध टीकाकार होऊन गेले.

---

# कलचुरि राजे.

**कलचुरि** अथवा **कुलचुरि** कुळालाच **हैहय** अशी

कलचुरि राजे.

संज्ञा होती ह्यांचा **चेदि**[1] देशावर अम्मल असे, व ह्यांचा **राष्ट्रकूट** घराण्याशीं शरीरसंबंध होता. **बिज्जल** हा **कलचुरि** घराण्यांतील असून, तो मांडलिक प्रभु असे. हा **कालंजर** पुरवराधीश्वर अशी पदवी धारण करी, व त्याच्या राजधानीचें ठिकाण **कालंजर** नामक किल्ल्यांत असे. **त्रिपुरी**[3]सही त्यांचें कधींकधीं ठाणें असे. हा केवळ मांडलिक असतांही त्यानें आपला स्वामी जो **तैलप** ह्यास हुसकावून लावून, **कल्याण**ची गादी व **दक्षिण**चें सर्वभौमत्व संपादन केलें ( शके १०८४ ). परंतु पुढें त्याच्याच अविचारामुळें तो प्राणास मुकला ( शके १०८९ ).

**बिज्जल** हा **जैन** धर्मानुयायी असे, व त्याचा मुख्य प्रधान **बसव** हा **लिंगायत** पंथांतला होता. त्यानें हा पंथ नवीनच स्थापन केला, व तदर्थ त्यानें आपल्या राजाच्या खजिन्यांतला अमूप पैसा उधळिला. त्यामुळें, त्या पंथांतले **जंगम** नांवाचे धर्माधिकारी व्यसनी होऊन, जिकडे तिकडे भ्रष्टाकार मातला. ही गोष्ट **मंचणणा** नांवाच्या **बिज्जल** राजाच्या मंत्र्यानें त्यास कळविली, व तेणेंकरून त्या राजास बहुत क्रोध आला. पुढें राजानें

१ हा जबलपूर नजीकचा प्रांत होय.

२ ह्मणजे अत्युत्तम नगर जें कालंजर, त्याचा स्वामी.

३ सांप्रतचें तेवुर.

इल्लेयग, व मधुवेय्य, या दोन लिंगायत साधूंचे डोळे काढविले, आणि त्या योगानें बसव व त्याचे अनुयायी अगदीं क्षुब्ध होऊन गेले. पुढें कल्याण शहरांत एकच कल्लोळ होऊन मोठी धामधूम उडाली. कोणीही आपल्या जीविताची पर्वा करीतनासा झाला. आपापसांत लढाई सुरू झाली. नगरांत रणकंदन मातलें. बसवानें कोणी एक जगद्देवाकडून विज्जलास ठार मारविलें, आणि कल्याण गांवास शाप देऊन, आपण संगमेश्वरास[1] गेला; व तेथें त्याचें देहावसान झालें. याप्रमाणें कल्याणची राखरांगोळी झाली, तें मातीस मिळालें, आणि बसवोचा शाप[3] खरा झाला.

विज्जलाविषयींचा जैनांनीं दिलेला वृत्तांत अगदीं भिन्न आहे. त्यावरून असें कळून येतें कीं, शिलाहार कुळांतील कोल्हापुरचा मांडलिक जो दुसरा भोज, याला पादाक्रांत करण्याकरितां विज्जलानें त्याजवर स्वारी केली. पुढें तिकडून परत येतांना, तो भीमेच्या तटीं उतरला असतां, जैनाच्या वेशानें एक जंगम विषयुक्त फलासहित बसवानें त्या राजाकडे पाठविला.

---

१ हे मलप्रभा व कृष्णेच्या संगमावर आहे.

२ हा मादिराज ब्राह्मणाचा मुलगा असून, तो कलादगी जिल्ह्यांत बागेवाडी येथें राहत असे.

३ बसव पुराण पहा.

**विज्जल** हा स्वतः **जैनच** असल्या कारणानें त्याच्या मनांत बिलकुल किंतु आला नाहीं, व त्या **जैनानें** दिलेलें फल त्यानें ग्रहण केलें. तें हुंगतांक्षणींच **विज्जल** बेशुद्ध पडला, आणि ही वार्ता ऐकतांच त्याचा मुलगा **इम्मदि विज्जल** हा त्याच्या समाचाराकरितां तात्काल धाऊन आला. पुढें कांहीं कालानें **विज्जल** जरासा शुद्धीवर आला आणि हें कृष्णकारस्थान कोणाचें तें पूर्णपणें समजून, त्यानें **बसवास** ठार मारण्याविषयीं आपल्या मुलास आज्ञा केली. त्याप्रमाणें **बसवास**, आणि जेवढे जंगम सांपडतील तेवढ्यांस, ठार मारण्याविषयीं त्यानें हुकम फर्माविला. ही बातमी ऐकून **बसव मलबारा**कडे पळाला, आणि **उलवि** गावीं जाऊन राहिला. त्यानंतर **उलवीस** राजपुत्राच्या आज्ञेनें वेढा पडला, आणि तें पाहून **बसवानें** विहिरींत उडी टाकून जीव दिला, व त्याच्या बायकोनें विष पिऊन प्राण सोडला. पुढें **बसवाचा** पुतण्या जो **चेन्नाबसव** यानें आलेला प्रसंग लक्षांत आणून, आपल्या चुलत्याची सर्व मालमिळकत त्या राजपुत्राच्या स्वाधीन केली, आणि आपण त्यास शरण गेला. तदनंतर त्याजवर राजकृपा झाली, व तो यापुढें **लिंगायत** समाजाचा पुढारी बनला.

शके १०८९ ( इ० स० ११६७ ) मध्यें **विज्जल** मरण पावल्यावर त्याचा मुलगा **सोमेश्वर** गादीवर बसला. ह्यानें शके ११०० पर्यंत राज्य केल्यावर त्याचा भाऊ

संकम हा सिंहासनारूढ झाला. त्यानें शके ११०४ पर्यंत राज्य केलें. आणि त्याच वर्षी **चालुक्य** घराण्यांतील राजपुत्र जो चवथा **सोमेश्वर** ह्यानें आपल्या पूर्वजांचें राज्य **कलचुरीं**च्यापासून पुनश्च छिनवून घेतलें, व तदनंतर **देवगीरीच्या यादवांकडे दक्षिणचें** प्रभुत्व आलें.

---

## यादव कुळांतील देवगिरीचे प्रथमचे राजे.

देवगिरीचे प्रथमचे राजे.

**देवगिरि** येथें राजधानीची स्थापना करून **यादव** कुळांतील ज्या राजांनीं राज्य केलें, त्यांची नामावली कालानुक्रमास अनुसरून या खालीं दिली[1] आहे. तथापि ती देण्यापूर्वी, **यादव** वंशाच्या पूर्वपीठिकेची माहिती निदान संक्षिप्त रीतीनें तरी देणें अगदीं अत्यावश्य आहे असें समजून, ती प्रथम देतों.

**यादवांच्याकडे** प्रथमतः **मथुरेचें** राज्य असे. **विष्णूचा** आठवा अवतार जो सुप्रसिद्ध **कृष्ण** याच्या वेळेपासूनच ते **द्वारवतीचे**, किंवा जिला **द्वारका** म्हणतात तिचे राजे झालें. तदनंतर अनेक शतकें लोटल्यावर **सुबाहूचा**

---

[1] ही डा. रा. गो. भांडारकरकृत दक्षिणच्या इतिहासावरून घेतली आहे.

पुत्र जो दृढप्रहार, याच्या वेळेपासून त्यांच्याकडे दक्षिणचें प्रभुत्व येत चाललें.

---

## प्रथमचे यादव राजे.

१ दृढप्रहार.
|
२ पहिला सेउणचंद्र.
|
३ पहिला धाडियप्प.
|
४ भिल्लम. १ ला.
|
५ राजगि किंवा श्रीराज.
|
६ वादुगि किंवा वद्दिग. १ ला.
|
७ धाडियप्प. २ रा.
|

१ शेज १ ते ५ पर्यंतचे राजे, पित्यापाठीमागून पुत्र, अशा परंपरेनें गादीवर बसले आहेत.

६ हा मागल्या राजाचा भाऊ असावा. (डा. भां. कृत दक्षिणचा इतिहास).

७ शेज ७ ते १२ पर्यंतचे राजे, पित्यानंतर पुत्र, अशा परंपरेनें गादीवर बसले आहेत.

८ भिल्लम. २ रा.
|
९ वेसुगि. १ ला.
|
१० अर्जुन.
|
११ भिल्लम. ३ रा.
|
१२ वादुगि. २ रा.
|
१३ वेसुगि. २ रा.
|
१४ भिल्लम. ४ था.
|
१५ सेऊणचंद्र. २ रा. शके ९९१.
| (इ. स. १०६९).
१६ परम्म.
|
१७ सिंह.
|

---

शेज १३ ते १७ ह्यांचें मागल्या राजांशीं कोणत्या प्रकारचें नातें होतें, तें समजत नाहीं.




---

# नंतरचे यादव राजे.

१ पहिला भिल्लम होय.
( शके ११०९-१११३.
इ. स. ११८७-९१ ).

---

१८ शेज १८ ते २० पर्यंतचे राजे, पित्यामागून पुत्र, अशा नात्यानें गादीवर बसले आहेत.

२१ हा गोविंदराजाचा चुलता होय.

२२ हा मागील राजा जो अमरमल्लगि त्याचा पुत्र होय.

२३ हा बल्लाळ राजाचा चुलता होय.

* २ जैत्रपाल किंवा जैतुगि.
(शके १११३ पासून
शके ११३२ पर्यंत. इ.
स. ११९१-१२१०).

३ सिंघण. (शके ११३२-११६९.
इ. स. १२१०-४७).

४ कृष्ण (कन्हार किंवा कंधार. (शके ११६९-११८२). इ. स. १२४७-१२६०.

५ महादेव (शके ११८२-११९३ इ. स. १२६०-७१).

६ रामचंद्र किंवा रामदेव. (शके ११९३-१२३१
इ० स० १२७१-१३०९).

७ शंकर. शके १२३१-१२३४. इ. स. १३०९-१३१२).

हरपाल. शके १२३४-१२४०. इ. स. १३१२-१३१८).

यादव कुलांतील जो सतरावा राजा सिंह यानें, लंजी-

* भिल्लमानंतर त्याचा मुलगा जैत्रपाल, व तदनंतर जैत्रपालाचा मुलगा सिंघण हा गादीवर बसला. सिंघणाला जैत्रपाल नांवाचा मुलगा होता. परंतु तो मरण पावल्यामुळें, जैत्रपालाचा मुलगा कृष्ण गादीवर बसला. पुढें कृष्णाचा भाऊ महादेव गादीवर बसला, व त्याच्या मागून त्याचा पुतण्या रामचंद्र सिंहासनारूढ झाला. त्यानंतर त्याचा मुलगा शंकर गादीवर बसला. त्याला एका मुसलमान सरदारानें ठार मारिलें, आणि पुढें शंकराचा जांवई हरपाल यानें बंड केल्यावरून, तोही प्राणास मुकला.

पुराहून **कर्पूरतिलक** नांवाचा हत्ती आणिला होता. तदनंतर त्याचा मुलगा **मल्लुगि** यानें **पर्णखेट** नांवाचें शहर हस्तगत केलें, आणि **उत्कल**[1] राजाच्या ताब्यांतून गजचमू देखील नेली. पांचवा **भिल्लम** हा सर्वांत विशेष पराक्रमी आणि साहसी होता, व त्यानेंच **यादव** राजांचें सार्वभौमत्व स्थापिलें, असें पुढील हकीकतीवरून दिसून येईल.

होय्सळ यादव.

**हैसूर** प्रांतांत **हळेबीड** गांवीं **होय्सळ यादव** हे **त्रिभुवन**मल्लाच्या कारकीर्दीपासून दिवसानुदिवस बरेच बलवान होत चालले होते. आणि **दक्षिण**चें प्रभुत्व संपादन करण्यासाठीं तत्कालीन **विष्णुवर्धन** राजानें **चालुक्यां**च्या राज्यावर हल्ला करून, **कृष्णावेणा** नदीतीरीं आपल्या फौजेचा तळ देखील दिला होता. परंतु **चालुक्य** राजा अति पराक्रमी व काबिल असल्यामुळें, त्या वेळीं कोणाचें, कांहींएक, तिळमात्रही, चाललें नाहीं. तथापि, आणखी तीन पिढ्या लोटल्यावर कालवशात्, **चालुक्य** व **कलचुरि** घराणीं अगदीं खालीं बसलीं, आणि ती संधी पाहून **विष्णुवर्धना**चा नातु जो **वीरबल्लाळ** यानें **चालुक्यांशीं** साम्ना केला. त्यांत **चालुक्य** राजा जो चवथा सोमेश्वर याच्या तर्फे **बोम्म ( ब्रह्म )** हा सेनाधिपति होता. परंतु त्याला

---

१ सांप्रतचा ओरिसा प्रांत.

२ दुसरा विक्रमादित्य.

यश आलें नाहीं. आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणें **वीरबल्लाळानें** त्या राज्याचे कित्येक प्रांत जिंकून, आपल्या राज्यांत सामील केले. **वीरबल्लाळ** हा **दक्षिणे**कडील जे **होय्सळ यादव** यांच्या कुळांतील होय.

अशा प्रकारचीं धामधुमीची वेळ पाहून, **उत्तरे**कडील

दक्षिणेकडील व उत्तरेकडील यादवांची झटापट.

ह्मणजे **देवगिरीचे यादव** स्वस्थ बसले नव्हते. त्यांनींही आपली सत्ता व राज्य वाढविण्याचें मनांत आणिलें. यावेळीं **बल्लाळ** राजा गादीवर होता, तथापि त्याचा चुलता जो **भिल्लम** याची तरतरी, चलाखी, साहस, व शौर्य, हीं कांहीं विलक्षण होतीं. त्यानें **अंसल** राजापासून **श्रीवर्धन** शहर घेतलें; **प्रत्यंडक** राजाचा लढाईत पराभव केला; **वज्री** नांवाचा जो **मंगलवेष्टका**[1]चा राजा त्याला ठार केलें; आणि **कल्याणचें** सार्वभौमत्व छिनावून, **दक्षिणे**कडील **होय्सळ यादवांस** खालीं पहावयास लाविलें. तदनंतर तो आपण स्वतःच राजा बनला.

---

१ सांप्रतचें मंगळवेढें. हें श्रीक्षेत्र पंढरपुराजवळ आहे.

२ यः श्रीवर्धनमाससाद नगरं क्षोणीपतेरंसला ( त् )
यः प्रत्यंडक भूभृतंच समरे दुष्टं त्यज ( जिगाय ) क्षणात् ।
योवामंगलवेष्टकं क्षितिपतिं श्रीवज्रिणं जघ्निवान्
कल्याण श्रियमप्यवाप्य विदधे यो होलसेयं वशे ॥ ३८ ॥

राजप्रशस्तिः ॥

प्रथमच्या यादवांची कारकीर्द.

प्रथमच्या **यादव** राजांची कारकीर्द, ह्मणजे **दृढप्रहार**पासून तों पांचव्या **भिल्लमा**पर्यंत, ४३७ वर्षांची असावी असें वाटतें. कारण, त्या कारकीर्दींत, सदरहू दोघेजण धरून, एकंदर तेवीस राजे होऊन गेले. आणि सरासरीच्या मानानें प्रत्येक राज्याची कारकीर्द एकोणीस वर्षांची धरली तर, तेवीस राजांनीं सुमारें ४३७ वर्षे राज्य केल्याचें होतें. त्यावरून ह्या घराण्याची स्थापना शके ६७६ ( इ० स० ७५४ ) च्या सुमारास होऊन, त्याची समाप्ति शके १११३ ( इ० स० ११९१ ) सालीं झाली, हें उघड आहे.

---

## नंतरचे देवगिरीचे यादव राजे.

नंतरचे देवगीरीचे यादव राजे.

याप्रमाणें **भिल्लमानें** पराक्रम करून **कृष्णा** नदीच्या उत्तर बाजूचा सर्व प्रांत आपल्या ताब्यांत आणिल्यावर, त्यानें **देवगिरी** नगराची प्रतिष्ठापना केली, आणि आपणास राज्याभिषेक करून **देवगिरी**सच आपली राजधानी स्थापिली. ( शके ११०९ ).

तदनंतर **भिल्लमानें दक्षिणे**कडे मोरचा फिरवून, त्या

भिल्लम.

बाजूला आपल्या राज्याचा विस्तार करण्याचें योजिलें. परंतु तो त्याचा हेतु सिद्धीस जाण्याला प्रथमतः पुष्कळच व्यत्यय आला. कारण, दक्षिणेकडील जे होयसळ यादव त्यांचा प्रभु वीरबल्लाळ असून, तोही उत्तर दिशेला आपलें राज्य विस्तृत करण्याच्या खटपटींत होता. तेव्हां अर्थात्च दो-घांचा झगडा होऊन, अनेक लढाया झाल्या. सरतेशेवटीं धारवाड जिल्ह्यांतील लोकिंगुंडि[1] गांवीं त्या उभयपक्षांत एक मोठी निकराची लढाई होऊन, त्यांत भिल्लमाचा जैत्रसिंह नांवाचा मुलगा पराभव पावला, आणि त्यामुळें वीरबल्लाळास जय मिळाला. तदनंतर अखिल कुंतल[2] प्रांत त्याच्या ताब्यांत आला, व तो पुनश्च जिंकून घेण्याचें काम, उत्तरेकडील यादवांस, बरींच वर्षें मागें टाकावें लागलें. ( शके १११३ ).

जैत्रपाल.

भिल्लमानंतर त्याचा मुलगा जैत्रपाल(ज्याला जैतुगि ह्मण-तात तो ) गादीवर बसला. ह्यानें अनेक राजांस पादाक्रांत करून, काकतेय कुलांतील रुद्रदेव नांवाच्या अंध्रांच्या[3] राजाला लढाईत

१ हें सांप्रतचें लकुंडिगांव होय.

२ दक्षिण महाराष्ट्र देश.

३ तैलंग देश.

ठार केलें. ह्याच राजाच्या पदरीं प्रसिद्ध **भास्कराचा**र्याचा पुत्र **लक्ष्मीधर** असून, तो सर्व **वेदांत** निष्णात, आणि **तर्कशास्त्रांत** व **मीमांसेंत** अगदीं पारंगत होता.

**जैत्रपालानंतर** त्याचा मुलगा **सिंघण** हा शके ११३२ मध्यें गादीवर बसला. ह्याच्या कारकीर्दींत उत्तरेकडील **यादवांचें** राज्य आणि बल फारच विस्तृत झालें. त्यानें **जज्जल** राजांचा पराभव केला; **कक्कुल** राजास पदच्युत केलें; **मालव** देशाचा राजा **अर्जुन**, व **मथुरा** आणि काशींचे राजे, यांस यमसदनास पाठविलें; **भोजे** राजास कैद केलें; **भंगारिगाच्या** राजाला जमीनदोस्त करून टाकिलें; **धारा** येथील राजाभोंवतीं आपल्या सैन्याचा वेढा दिला; **गुर्जर** राजास जेरीस आणिलें; आणि **वीरबल्लाळाच्या** ताब्यांतील सर्व मुलुख घेतला.

सिंघण.

**सिंघणानें** **गुजराथेवर** अनेक स्वाऱ्या केल्या, व त्यांचें आधिपत्य, आणि तत्संबंधीं देखरेख, हीं त्यानें त्यावेळीं **खोलेश्वर** नामक **ब्राह्मणाकडे** सोंपिलीं. ह्याचें गोत्र **मुद्गल** असून, तो मोठा शूर व पराक्रमी मांडलिक होता. शेवटल्या स्वारींत **लवणप्रसाद** नामक महामंडलेश्वराचा अगदीं मोड झाला, व त्यानें **सिंघणाशीं** तह केला.

---

१ हे भरतखंडांतील अति प्रसिद्ध गणिती व ज्योतिषी होत.

२ हा कोल्हापुरचा राजा होय. हा शिलाहार वंशांतील होता.

ज्याप्रमाणें **खोलेश्वरानें** उत्तरेकडे पराक्रम करून कीर्ति संपादन केली, आणि आपल्या **यादव** प्रभूंचा यशोध्वज फडकाविला, त्याचप्रमाणें **बीचणानें**[1]ही **दक्षिणेकडे** चांगला पराक्रम करून यश मिळविलें. ह्याला **सिंघणानें**[2] आपल्या **तर्फेचा सुभेदार** म्हणून **दक्षिण**चा राज्यकारभार चालविण्याकरितां नेमिला होता. त्यानें सर्व शत्रूंचा पराभव केला. **रट्ट** नांवाचे दक्षिण **महाराष्ट्र** देशाचे मांडलिक, **कोंकणचे** म्हणजे **गोव्यांचे कदंब** राजे, **गुप्तोद्भव गुत्त** नांवाचे दक्षिणेकडील मांडलिक, **पांड्ये** राजे, **होय्सळ** राजे, आणि इतर मांडलिक प्रभु, या सर्वांचा त्यानें खरपूस समाचार घेऊन त्यांस जेरीस आणिलें, व त्या सर्वांस **सिंहण** चक्रवर्तीचे अंकित केलें. अशा प्रकारें अनेक पराक्रम करून, आपल्या प्रभुची धवलकीर्ति चिरकाल रहावी या उद्देशानें, **बीचण** यानें **कावेरी** नदीच्या तटीं एक **जयस्तंभ** उभारला. ( शके ११६०. इ० स० १२३८. )

याप्रमाणें **सिंहणाचें दक्षिणेंत** अति विस्तृत व एकछत्री राज्य झालें. त्याचा पुत्र **जैत्रपाल** किंवा **जैतुगी** हा देखील मोठा पराक्रमी, शूर, सकलकलांचें माहेरघर, व शत्रूंचा केवळ काळच होता. परंतु तो **सिंहणाच्या**

---

१ ह्यालाच बीच असेंही नांव होतें. हा चिक्काचा पुलगा व मल्लाचा धाकटा भाऊ होय.

२ सिंघण हा सिंहणाचा अपभ्रंश आहे.

अगोदरच मरण पावला. **सिंहणा**च्या पदरीं **चांगदेव** नांवाचा मुख्य ज्योतिषी होता. हा **लक्ष्मीधरा**चा पुत्र असून, प्रसिद्ध **भास्कराचार्या**चा नातू होता. **सिंहण** शके ११६९ सालीं, ह्मणजे इ० स० १२४७ व्या वर्षी निवर्तला.

कृष्ण.

**सिंहणा**नंतर त्याचा नातु **कृष्ण**, म्हणजे त्याचा स्वतःचा पुत्र जो **जैत्रपाल** त्याचा मुलगा, गादीवर बसला. ( शके ११६९ इ० स० १२४७ ). हाही आपल्या बापाप्रमाणें व आज्याप्रमाणेंच मोठा शूर, साहसी, आणि पराक्रमी होता. त्याचें नांव ऐकून **मालव**, **गुजराथ**, आणि **कोंकण**च्या राजांचा थरकांप होई. तो इतका तरवारबाहादुर असे कीं, तो हवें त्यास रावाचा रंक आणि रंकाचा राव करी; पाहिजे त्यास गादीवर बसवी; आणि मनमानेल त्यास पदच्युत करी. ह्याला कर्मकांडाची मोठी आवड असल्यामुळें, त्यानें पुष्कळ यज्ञ केले, व त्या कारणानें सनातन **वेद** धर्मास पुष्कळच प्रोत्साहन मिळालें. ह्यानें शके ११८२, ( इ० स० १२६० ) पर्यंत राज्य केलें.

महादेव.

**कृष्णा**नंतर त्याचा भाऊ **महादेव** गादीवर बसला. हा फार पराक्रमी असे, व ह्याला सर्व राजे थरकांप भीत. ह्यानें **तैलं**-

---

१ ह्याचीं प्राकृत नांवें म्हटलीं म्हणजे कन्हार, कन्हर, किंवा कंधार हीं होत.

**गण**च्या राजास आपल्या प्रतापाच्या झंझावातानें केवळ कापसाप्रमाणें फुंकून दिला; **गुर्जर** देशास धुळीस मिळवून तद्देशीय राजांच्या गर्वोक्तीचा परिहार केला; **कोंकण**च्या राजाचा हं हं ह्मणतां फडशा उडवून तो प्रांत आपल्या राज्यास जोडला; आणि **कर्नाट** व **लाट** देशांच्या राजांस अंकित करून, त्यांच्या दर्पाची निव्वळ विटंबनाच केली.[1]

स्त्रीची अथवा बालकाची हानि, **चक्रवर्ती** राजा **महादेव** हा कधीं देखील करीत नाहीं, अशी त्याची कीर्ति असल्यामुळें, **अंध्रांनीं**, केवळ त्याच्या भयानें गर्भगळित झाल्या कारणानें, एका स्त्रीसच गादीवर बसविलें.[2] आणि **माळव्या**[3]च्या राजानें तर एका अर्भकासच राज्याभिषेक

---

१ तैलिंग क्षितिपालतूलनिचय प्रक्षेप चंडानिलो
गर्जद् गुर्जर गर्व पर्वतभिदा दंभोलिदोर्विक्रमः ।
हेलोन्मूलित कौंकणक्षितिपतिः कर्णाट लाटोद्भव
क्षोणीपाल विडंबनःसहि महादेवःकथं वर्ण्यते ॥ ४८ ॥
( राजप्रशस्ति. १ ).

२ अयं शिशुस्त्री शरणागतानां हंता महादेवनृपो न जातु ।
इत्थं विनिश्चित्य ततोतिभीतैरंध्रैः पुरंध्री निहिता नृपत्वे ॥१४॥
( राजप्रशस्ति. )

३ अतएव हि मालवेश्वरः शिशुमेव स्वपदे न्यवेशयत् ।
स्वयमाशु विहाय संपदः कपटे नैव चिरं तपस्यति ॥ १५ ॥
( राजप्रशस्ति. २ ).

करून, केवळ त्याच्या भीतीमुळें संत्रस्त होत्साता, आपण कृत्रिम तपश्चर्यार्थ वनांत गेला, व तेथें अनेक वर्षे राहिला.

**महादेवा**ची राजधानी **देवगिरी**सच असून, तें शहर त्याकाळीं मोठ्या नांवारूपास आलें असल्याचें दिसतें. कारण, **हेमाद्री**च्या **राजप्रशस्ती**मध्यें तत्संबंधीं विशेष वर्णन आहे, व तींत असें लिहिलें आहे कीं, हें नगर त्रैलोक्याच्या सौन्दर्याचें केवळ निजधामच असून, तेथें अत्युच्च मंदिरें व प्रचंड भुवनें आहेत. **दंडकारण्या**ला लागून असलेला जो **सेउणदेश**, म्हणजे सांप्रतचा **खानदेश**, यांतच **देवगिरि** अथवा हल्लींचें **दौलताबाद** वसलेलें असल्याचें दिसतें. आणि **राजप्रशस्ती**वरून, हा सर्व देशच मोठ्या भरभराटीच्या स्थितींत असावा असें वाटतें.

त्याचा मुख्य मंत्री हेमाद्रि.

**महादेवा**चा आणि **रामदेव** राजाचा मुख्य मंत्री **हेमाद्रि** होता. ह्याच्या बापाचें नांव **कामदेव**, ह्याचें गोत्र **वत्स**, व तो जातीचा **ब्राह्मण** असे. ह्याला **श्रीकरणाधिप**, किंवा **श्रीकरणप्रभु**, असा किताब असल्याचें दिसतें. हा मोठा शूर

१ आस्ते मंडित दंडका परिसरः श्री सेउणाख्यः परम्
देशः पेशलवेशभूषणवचो माधुर्य धुर्याकृतिः ।
तस्मिन् देवगिरिः पुरी विजयते त्रैलोक्यसारश्रियाम्
विश्रांतिः सुरशालि शैलशिखरस्पर्धिष्णु सौधावलिः ॥ १९ ॥
(राजप्रशस्ति. )२

व विद्वान असून, ह्याचे मुख्यत्वेंकरून **धर्मशास्त्रावर** **ग्रंथ** आहेत. ह्यानें अनेक **स्मृति** व **धर्मशास्त्रें** एकत्र करून, त्यांची पद्धतशीर आणि सुसंगतवार व्यवस्था लाविलेली आहे. ह्याचा मुख्य ग्रंथ ह्मटला ह्मणजे **चतुर्वर्गचिंतामणि** होय. ह्याचे १ **व्रत**खंड, २ **दान**खंड, ३ **तीर्थ**खंड, आणि ४ **मोक्ष**खंड, असे चार भाग आहेत. ५ पांचव्या खंडाला **परिशेषखंड** अशीही संज्ञा असून, त्यांत १ नानाविध देवतांची पूजा, २ श्राद्धसंस्कार, ३ कर्मकांडकरण्यासंबंधीं कालविवेचन, आणि ४ प्रायश्चित्त, याविषयीं संपूर्ण माहिती आहे. **आयुर्वेद**रसायन नांवाचा ग्रंथ देखील, ह्यानेंच रचला असल्याचें सांगतात. सर्व **महाराष्ट्रीयांस** महशूर असा जो सुप्रसिद्ध **हेमाडपंत**, तोच हा **हेमाद्री** होय. दगडी कळाशीचीं, आणि बगरचुन्याचीं जीं असंख्य देवाळयें सर्व **महाराष्ट्र देशभर** पसरलेलीं दृष्टीस पडतात, तीं **हेमाद्री**नेंच बांधलेलीं होत. आणि **महाराष्ट्र** देशांत जी **मोडी** लिपी सुरू आहे, ती देखील **हेमाद्री**नेंच **लंकें**तून ( **सिंहलद्वीपां**तून ) इकडे आणिली असल्याचें सांगतात.

रामदेव.

**महादेवा**नंतर त्याचा पुतण्या **रामचंद्र**, ज्याला **रामराजा** किंवा **रामदेव** ह्मणतात तो, गादीवर बसला. (शके ११९३.इ० स० १२७१). ह्यानें एकदां देखील एकादा पराक्रम करून आपली तरवार गाजविल्याचें, किंवा कांहीं बहादुरी केल्याचें,

कळून येत नाहीं. ह्याच्या कारकीर्दींत, ह्याच्याच दौर्बल्यानें, **मुसलमानां**चा **दक्षिणें**त पगडा बसला, आणि तेव्हांपासून तों **श्रीशिवाजी छत्रपतीं**चें पुनश्च साम्राज्य होईपर्यंत, **दक्षिणें**तील **हिंदूं**चें स्वातंत्र्य नष्ट झालें.

मुसलमानांची दक्षिणेवर स्वारी.

ह्या शतकांत **मुसलमान** लोक **उत्तर हिंदुस्थानांत** बहुतेक चिरस्थायीच झाल्यासारखे होते, आणि **दक्षिणे**वरही त्यांचा डोळा होताच. मात्र संधी केव्हां आणि कशी मिळेल, याचीच त्यांजला अपेक्षा होती. अशा वेळीं, शके १२१६ ( इ० स० १२९४ ) सालीं, **अल्लाउद्दीन खिल्जीनें** सुमारें आठ हजार सैन्यानिशीं **दक्षिणें**त स्वारी केली, आणि अकस्मात् **देवगिरी**जवळ दाखल झाला, व किल्ल्याला वेढा दिला. **रामदेवा**च्या हें स्वप्नीं देखील नसल्यामुळें, त्याची लढाई करण्याची बिलकुल तयारी नव्हती. सबब त्यानें आपलें सामर्थ्य पाहून, व शत्रूला मागून कुमक येत आहे असें ऐकून, **अल्लाउद्दीनाशीं** तहाचें बोलणें लाविलें, आणि तें त्यानें आपणांस पुष्कळ द्रव्य मिळेल अशा शर्तीवर कबूल केलें. इतक्यांत, **रामदेवा**चा मुलगा जो **शंकर** हा मोठ्या फौजेनिशीं आपल्या बापाच्या मदतीस आला. परंतु ती बातमी **अल्लाउद्दीनास** लागतांच, त्यानें सुमारें हजार सैन्य, किल्ल्याचा वेढा कायम राखण्यासाठीं ठेवून, बाकीचें **शंकराच्या सैन्या-**

बरोबर लढाई मारण्याकरितां नेलें. ह्या वेळीं हिंदूंचें सैन्य मोठें असतांही त्यांची गाळण झाली. त्यांस असें वाटलें कीं, मागून जी मुसलमानांस मदत येत आहे, तीच ही होय. अशा प्रकारच्या भीतीनें एकंदर सैन्याची दाणादाण होऊन, हिंदूंचा अगदीं मोड झाला.

पुढें अल्लाउद्दीनाशीं तहाचें बोलणें लावणें भाग पडलें. परंतु त्यानेंही, हीच संधी पाहून, आपली मागणी वाढविली, व ती नाइलाजामुळें रामदेवानें कबूल केली. तदनंतर ६०० मण मोत्यें, २ मण रत्नें, १००० मण रुपें, ४००० रेशमी कपडे, आणि इतर मौल्यवान वस्तु, अल्लाउद्दीनास पोहोंचल्यावर त्यानें दिल्लीची वाट धरली. ह्याशिवाय, एलिचपुर परगणा देऊन, आणखी वार्षिक खंडणी दिल्लीस पाठविण्याचेंही, रामदेवास कबूल करावें लागलें.

तदनंतर शके १२३१ (इ० स० १३०९) मध्यें, राजा रामदेव मरण पावला, व त्याचा मुलगा शंकर गादीवर बसला.

शंकर.

परंतु तो वार्षिक खंडणी दिल्लीस पाठवीतनासा झाला. सबब त्याला वश करण्याकरितां, शके १२३४ (इ० स० १३१२) सालीं, मलिक काफर नांवाच्या सरदाराला दिल्लीहून दक्षिणेंत पाठविण्यांत आलें. त्यानें शंकरास ठार मारून त्याच्या राज्याचा विध्वंस केला, आणि आपलें कायमचें ठाणें देवगिरीसच बसविलें.

इकडे **अल्लाउद्दीनानें** आपल्या वयोवृद्ध चुलत्यास ठार मारून, आपणच गादी बळकाविली होती. ह्याच्यापाशीं **मलिककाफर** नांवाचा सदरीं लिहिलेला सरदार होता; व ह्याजवरच त्याचें विशेष प्रेम असल्या कारणानें, त्याचें सरकार दरबारांत उत्तम प्रकारचें, किंबहुना वाजवीपेक्षांही जास्त वजन असे. तें कित्येक **मुसलमान** सरदारांस न आवडून, त्यांनीं बंड केलें. पुढें **अल्लाउद्दीन** मेला, आणि त्याचा तिसरा मुलगा **मुबारिक** गादीवर बसला. ही संधी पाहून **रामदेवाचा** जांवई **हरपाल** यानेंही बंड करून, कित्येक **मुसलमान** सुभेदारांस हांकून लाविलें. त्यानंतर शके १२४० ( इ० स० १३१८ ) मध्यें, **मुबारिकनें** स्वतः **दक्षिणेवर** स्वारी करून, **हरपालास** कैद केलें, आणि त्याला अति क्रूरतेनें ठार मारलें. याप्रमाणें **दक्षिणेंतील हिंदु** साम्राज्याचा शेवट झाला.

दक्षिणेंतील हिंदु साम्राज्याचा शेवट.

**रामदेवाच्या** कारकीर्दीत, सुप्रसिद्ध महासाधु **ज्ञानदेव** उदयास आला. **भगवद्गीतेवर ज्ञानेश्वरी** म्हणून जी त्याची सुविख्यात टीका आहे, तींत शेवटीं त्यानें आपला, आपल्या बापाचा, आपल्या राजाचा, आणि

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध साधु ज्ञानदेव.

आपल्या देशाचा थोडक्यांत वृत्तांत दिला[1] आहे. त्यावरून असें कळून येतें कीं, हा साधुवर्य **महेश** गोत्रांतील असून, त्याच्या बापाचें नांव **निवृत्तिनाथ** होतें. त्याचें राहण्याचें ठिकाण **महाराष्ट्रांत गोदावरीच्या** दक्षिणतीरीं असून, त्या पंचक्रोशींत **श्रीमहालया** नांवाचें अति पवित्र स्थान, आणि **यदुकुळांतील श्रीरामचंद्र** राजाचें न्यायी राज्य असे. ही सुप्रसिद्ध टीका शके १२१२ ( इ० स० १२९० ) मध्यें संपूर्ण झाली.--

---

१ ऐसें युगीं परीकळी । आणि महाराष्ट्र मंडळी ।
श्रीगोदावरीच्या कुळीं । दक्षिणलीं ॥ १ ॥
त्रिभुवनैक पवित्र । अनादि पंचक्रोश क्षेत्र ।
जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया असे ॥ २ ॥
तेथ यदुवंशविलास । जो सकळ कळानिवास ।
न्यायातें पोषी क्षितीश । श्रीरामचंद्र ॥ ३ ॥
तेथ महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें ।
केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥ ४ ॥

# भाग. १९ वा.

## प्राचीन आर्य भूगोल.

ज्या प्रदेशाला आपण सांप्रतकाळीं **हिंदुस्थान** ह्मणतों, त्यालाच प्राचीन काळीं **भरतखंड** ह्मणत असत. प्राचीन हिंदु-भू-गोल-वेत्त्यांनीं अखिल पृथिवीची एकंदर सातें महाद्वीपें कल्पिलीं होतीं. व आपल्या रोजच्या पूजेंत देखील "**सप्तद्वीपावसुंधरा**" असा येत असलेला पाठ वाचकांच्या लक्षांत असेलच. त्यावरून आपल्या हिंदु भूगोलवेत्त्यांस, पृथिवीचे एकंदर विभाग, स्थूलमानानें माहीत असावेत असें खचित वाटतें.

प्राचीन भरतखंडां-तील भूगोलशास्त्र.

सप्तद्वीपें.

---

१ पृथिवीच्या एकंदर विभागाबद्दल आमच्या आर्य भूगोलशास्त्र-वेत्त्यांत बराच मतभेद दिसतो. कांहींच्या मतें या पृथ्वीचे चार विभाग किंवा खंडें आहेत. आणि कांहींनीं ह्याच भूगोलाचीं सात, नऊ, किंवा तेरा द्वीपें कल्पिलीं आहेत. त्यांपैकीं, नऊ द्वीपांची संख्या खालीं लिहि-ल्याप्रमाणें होयः—

१ कुरु. २ हिरण्मय. ३ रम्यक. ४ इलावृत. ५ हरि. ६ केतुमा-ला. ७ भद्राश्व. ८ किन्नर. व ९ भारत.

सदरहू सात द्वीपांपैकीं पहिल्या महाद्वीपास **जंबूद्वीप** असें नांव दिलें असून, त्या **जंबूद्वीपाचे " वर्ष "** या संज्ञेनें नऊ भाग कल्पिले होते. त्यांपैकीं पहिल्यास **अजनाभ** किंवा **भरतवर्ष** असें ह्मणत. ह्या **भरतवर्षाचीं** नऊ खंडें कल्पून, त्यांतील पहिल्या खंडास '**भरतखंड**' असें नांव ठेविलें. कारण, हल्लींच्या कल्पांतला आठवा **मनु** जो **स्वारोचिष** त्याच्या ज्येष्ठ पुत्राचें नांव **भरत** असून, तोच या खंडावर पूर्वीं राज्य करीत होता; सबब त्याचेंच नांव या खंडास दिलें.

जंबूद्वीप.

भरतखंड.

**भरतखंडाला हिंदुस्थान** हें नांव **ग्रीक** व **पारसीक** लोकांनीं **सिंधु** नदीवरून दिलें असावें असें वाटतें. तथापि, **व्यंकटराव रामस्वामी पंडित**[2] हे असें ह्मणतात कीं, **कौरवपांडवादि** हे **इंदु** ( सोम ) वंशी राजे येथें होऊन गेल्यामुळें, त्यांचेंच वसतिस्थान या अर्थानें, **इंदुस्थान** हें नांव या देशास पडलें असून, त्याचेंच पुढें **हिंदुस्थान** असें रूप झालें.

इसवी शकापूर्वीं सुमारें हजार बाराशें वर्षांमागें, **भरतखंडाला**, म्हणजे **दक्षिणपथाशिवाय** सर्व **हिंदुस्थानाला**, " **आर्यावर्त** "

आर्यावर्त.

---

१ पुस्तक पहिलें. भाग पहिला. पान ४१५ पहा.

2. vide His Geographical Table of Bharatakhanda.

असें म्हणत. व त्याविषयीं मनुस्मृतींतही आधार मिळतो. त्यावरून पूर्व व पश्चिम समुद्र, आणि हिमनग व विंध्य, यांच्या दरम्यानचा प्रदेश आर्यावर्त्त होय.

**आसमुद्रात्तुवै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात् ।**
**तयोरेवान्तरं गिर्यो " रार्यावर्तं " विदुर्बुधाः ॥२२॥**

( मनुस्मृति. द्वि. अ. श्लोक २२ )

मनुस्मृतींत ब्रह्मावर्त, ब्रह्मर्षिदेश, आणि मध्यदेश, यांचें जें सीमावर्णन केलें आहे त्याअन्वयें, सरस्वती आणि

ब्रह्मावर्त.

दृषद्वती या नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश " **ब्रह्मावर्त** " असून कुरुक्षेत्र, मत्स्यदेश, पंचालदेश, व शूरसेन

ब्रह्मर्षिदेश.

मिळून, " **ब्रह्मर्षिदेश** " अशी संज्ञा होती. तसेंच हिमालय आणि विन्ध्य पर्वत यांच्या दरम्यानचा जो प्रदेश गुप्त झालेल्या सरस्वतीच्या पूर्वेस, व प्रयागाच्या पश्चिमेस आहे, तो

मध्यदेश.

'**मध्यदेश**' या नांवानें सुप्रसिद्ध होता.

याबद्दल खालीं लिहिलेली स्मृति प्रमाण आहेः—

सरस्वती दृषद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् ।
तंदेवनिर्मितंदेशं ' **ब्रह्मवर्तं** ' प्रचक्षते ॥ १७ ॥
कुरुक्षेत्रं च मत्स्याश्च पंचाला शूरसेनकाः ।
एष ' **ब्रह्मर्षिदेशो** ' वै ब्रह्मावर्तादनंतरम् ॥१९॥

हिमवद्विंध्ययोर्मध्यं यत्प्राग् विनशनादपि ।
प्रत्यगेव प्रयागाच्च 'मध्यदेशः' प्रकीर्तितः ॥२१॥
( मनुस्मृति. द्वि. अ. )

प्राचीन भरतखंडाचे पांच भाग.

**भरतखंडांतील** कांहीं भूगोलकारांनीं[1] ह्या देशाचे मुख्य पांचच भाग मानिले असून, त्यांस तत्तद्दिशा संज्ञक अशीं नांवें दिलीं होतीं. १ **उदीची**; २ **मध्यदेश**; ३ **प्राची**; ४ **प्रतीची**; आणि ५ **दक्षिणपथ.**

उदीची.

**उदीचीः**—यांत १ ऋषीक देश; २ **दरद** ( तुर्कदेश ? ); ३ **बल्ख** प्रांत ( ज्याला **पाश्चिमात्यांनीं बाक्ट्रिया** अशी संज्ञा दिली आहे तो ); ४ **आफगाणिस्थान**; ५ **बलुचिस्थान**[2]; ६ **काश्मीर**; आणि ७ **पंजाब** यांचा समावेश होतो.

---

१ मत्स्य पुराण अ. ११३.

2. "The Indians on the sea-shore were named Oritàe and Arabitäe, and are recognised by Major Rennell as the people called Asiatic Ethiopians by Herodotus. Their country was the narrow tract between the mountains of Baluchisthan and the sea, separated from Mekrán on the west by the range of hills which form Cape Arboo, and on which still stands the famous Hindu temple of Hinglez".

( Elphinstone's India P. 447 ).

ऋषीक देश.

१ ऋषीक देश हा **महाभारतावरून** उत्तरेकडील **रशिया** असल्याचें कळतें.

दरद देश.

२ **दरद** देश हा **भारत** प्राचीन ऐतिहासिक कोशकारांनीं **भारतां**तील आधार देऊन, **बल्ख** प्रांताच्या उत्तरेस असल्याचें सिद्ध केलें आहे. ह्यांत **आशियां**तील **तुर्कस्थान**च्या विस्तीर्ण प्रदेशाचा समावेश होतो. किंबहुना यांत **कास्पियन** समुद्रापासून तों तहत **हिंदुकूश** पर्वतापर्यंच्या प्रदेशाचाही समावेश होईल, असें वाटतें. आणि ह्या टापूंत थेट **मास्को**पर्यंतही देशान्तराधिवासी असे **हिंदूच** इतस्ततः पसरलेले दृष्टीस पडतात. **पांडवांच्या** वेळीं तर **अर्जुन** हा थेट उत्तरेकडील ऋषीक देशांत ( **रशियां**त ) ही जाऊन थडकला असल्याविषयीं **भारतावरून** कळून येतें.

---

1. " Throughout the whole of the plain to the west of the Indus, from the range of Caucasus to the sea, the greater part of the original population are Jats, ( Rajpoots ), * * * * who speak an Indian language, and are now classed with the Indians by their western neighbours. * * *. Some of the so called Indians are Hindus, but the greater part are converts to the Mahametan religion ".

( Elphinstone's India. P. P. 451 452 ).

2. Hindu emigrants are " found scattered through the countries on the west of the Indus as far as Moscow ".

( Elphinstone's India. P. 452 ).

बल्ख प्रांत.

३ बल्ख याळाच पूर्वी ग्रीक लोक बाक्ट्रिया असें ह्मणत. हा प्रदेश कांश्मीरच्या पलीकडे अफगाणिस्थानच्या उत्तरेस[1] असून, भारतांमध्यें[2] आणि मत्स्य पुराणांत[3] देखील, ह्याची उत्तरेकडीलच सीमा दिलेली आहे.

अफगाणिस्थान.

४ आफगाणिस्थानांत कंदहार ह्मणून जें सुप्रसिद्ध शहर आहे त्यालाच पूर्वी गांधार[4] असें म्हणत. स्ट्रांबो[5] आणि टालेमी[6] यांनीं त्याला "गॅंडरिटिस्" ( Gandaritis ) असें नांव दिलें असून, भारतांतील[7] वर्णनावरून गांधार म्हणजे कंदहार, हीच गोष्ट सिद्ध होते; व रामायणांत[8] देखील ह्या देशाची तीच सीमा दिली आहे. शैलुष हे गंधर्वांचे वंशज असून ते या देशांतील राजे होते, असें भारतांत वर्णन आहे. त्यावरून गंधर्वांचें गांधर्व, आणि गांधर्वांचें

---

1. Professor Lassen's Map for Indian Antiquities.

२ भारत सभापर्व. अ. ३०; भा. प्रा. ऐ. कोश. पान ३७५.

३ बाल्हीका वाट धानाश्च आभीरा कालतो यकाः ॥ ४० ॥

4. Professor Lassen's Map for Indian Antiquities.

5. Strabonis' Geographia.

6. Ptolomaee Geographia.

७ भारत आदिपर्व. अ. ११० भा. प्रा. ऐ. कोश. पा. १८८.

८ वाल्मिकी रामायण. उ. स. १००.

**गांधार**, असें रूप झालें असावें. **धृतराष्ट्रा**ची पत्नी **गांधारी** ही **गांधार** देशाच्या राजाची मुलगी असून, एकंदर ऐतिहासिक माहितीवरून हल्लींचें **कंदहार** शहर हें प्राचीन जो **गांधार** देश, त्याचाच भाग असावा असें वाटतें. **तक्षशिला** आणि **पुरुषपुर** ( पेशावर ) हीं ह्या देशाचीं राजधानीचीं शहरें असल्याविषयीं लेख सांपडतो. ह्या शहराला **चिनी** ग्रंथकार "पुलुशोपोलो" असें नांव देतात. '**परशवर**' किंवा 'पुरुषपुर' हें नांव मोडून "**पेशावर**" असें नांव **अकबरानें** दिलें असून, त्याचा अर्थ **इस्लाम** भाषेंत "सीमेवर असणारें शहर" असा होतो. हें शहर प्रसिद्धीस येण्याला मुख्य कारणें ह्मटलीं ह्मणजे **बुद्धाचें** भिक्षापात्र, व पंधराशें वर्षांचा अतिपुराण **अश्वत्थ** वृक्ष ( पिंपळाचें झाड ), हीं होत. ह्या वृक्षाजवळच **पेशावर**चा राजा **कनिष्क**, याचा सर्व स्तूपांत अति प्रचंड असा एक स्तूप असून, तो इ० स० ६३० सालीं, **हुणसंग** नांवाचा जो प्रसिद्ध **चिनी** प्रवासी, याच्या दृष्टीस पडला होता; परंतु तो हल्लीं त्या ठिकाणीं नाहीं. **पुरुषपुराच्या** पूर्वेस **पुष्कलावती** नांवाचें एक प्राचीन शहर असून, तें देखील कांहीं दिवस ( **गांधार** ) **कंदहार**ची राजधानी होतें. ह्या नगराची स्थापना **भरताचा** मुलगा **पुष्कल** यानें केली

1. Cunningham's Ancient Geography of India. PP. 47 48. Lassen's Map for his Indian Antiquities.

असल्यामुळें त्याला तन्नामधेय पडलें होतें. **शिकंदराच्या** वेळीं **गांधार** देशाची राजधानी **पुष्कलावतीच** होती. **काबुलाला** पूर्वी **उर्द्धस्थान** असें नांव, तें उच्च प्रदेशावर असल्यामुळें, दिलें होतें. **स्ट्रेबो, प्लिनी,** आणि **ह्णूणसंग** यांनीं त्याला **ओरटोस्पान** ( ortospana ) असें नांव दिलें आहे.

बलुचिस्थान.

५ **बलुचिस्थानांत आबू** नामक भूशिरावर प्रसिद्ध **हिंदु** देवालय असल्याविषयीं मागें सांगितलेंच[1] आहे.

काश्मीर.

६ **काश्मीर** देशाची प्राचीन काळची राजधानी **पुराणाधिष्ठान** शहर होतें. तदनंतर पुढें इ० स० च्या सहाव्या शतकांत ह्या राजधानीच्या **आग्नेयीस** सुमारें एक कोसावर, अधिष्ठान नामक राजधानी स्थापिली होती ही दुसऱ्या **प्रवरसेन** राजानें मोडून टाकिली, आणि तिच्या जागीं **श्रीनगर** नांवाचें नवीनच राजधानीचें शहर वसविलें. ह्याला **प्रवरसेनपुरही** म्हणत. **प्रवरसेनाच्या** आधीं इ० स० च्या पूर्वी २६३ व्या वर्षी, **श्रीनगर** नांवाचें नगर त्याच जागीं **अशोक** नामक चक्रवर्ती राजानें वसविलें असून, तन्निकटवर्ति स्तूपांत **बुद्धाच्या** दांताची प्रतिष्ठापना इ० स० च्या ३६१ व्या वर्षी झाली असल्याविषयीं कळून येतें.

१ एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानचा इतिहास.

2. Cunningham's Ancient Geography of India.

पंजाब.

७ **पंचनद**[1], **पांचाल**, किंवा **पंजाब**, ही संज्ञा **सिंधूला** मिळणाऱ्या पांच नद्यांच्या दरम्यान जो प्रदेश आहे त्याला असून, **भारतां**[2]त देखील सदरहू **वायव्येकडील** प्रदेशाचा " **पंचनद** " असाच उल्लेख केला आहे. **पांचालें**[3] हें नांव पडण्याचें कारण असें समजतें कीं, **भम्र्योश्व** किंवा **भद्राश्व** हा ह्या देशाचा राजा असून त्याला अतिपराक्रमी असे पांच पुत्र होते. सबब त्यांविषयीं तो मोठ्या प्रेमानें आणि पुत्रवात्सल्यानें असें ह्मणत असे कीं, माझ्या राज्याचें संरक्षण करण्याला " मम पंच पुत्रा अलम्. " त्यावरून त्या पंचपुत्रांस **पंचाल**, आणि त्यांच्या देशाला **पांचाल**, असें नांव पडलें. ह्या देशांतील **द्रुपद** राजाची कन्याही **पांचाली** या नांवानें प्रसिद्ध असून, ती पांच **पांडवांस** दिली होती. **पांचाल** म्हणजे **पंजाब**, असें खालीं लिहिलेल्या श्लोकावरूनही सिद्ध होतें. कारण, **सिंधूला** मिळणाऱ्या नद्यांपैकीं एकीचें नांव **चंद्रभागा** होतें.

> **चंद्रभागा** महानद्या स्तीरं प्राप्य सुखेन वै ।
> **पांचालस्य** पुरं सम्यग् दृष्ट्वा तस्मिन् प्रविश्यह ॥१॥
>
> हिं. अ. को.

---

1. Professor Lassen's Map for Indian Antiquities.
२ सभापर्व अ० ३२.
३ भाग. स्कन्द १; अ. १०.

शालातुर.

**शालातुर** ( लाहोर ) ही **पंजाब**ची राजधानी असून, त्याच ठिकाणीं प्रसिद्ध वैयाकरणी जो **पाणिनि** हा जन्मला होता. ज्याप्रमाणें **सिंधूचीं** ( सिंधु=हिंदु=इंदु=इंदस् अशीं ) रूपें झालीं आहेत, त्याचप्रमाणें **शालातुराचीं** ( शालातुर= हालातुर=लातुर=लावोर=लाहोर, अशीं) रूपें झालीं आहेत.

लाहोर.

**लाहोर** शहराविषयीं दुसरा असा लेख सांपडतो कीं, **रामपुत्र** जो **लहु** ( किंवा **लव** ) यानें तें वसविलेलें असल्यामुळें, त्याला **लववर** असें नांव पडून, त्याचाच पुढें **लाहोर** असा अपभ्रंश झाला. **लक्ष्मण** आणि **कुश** यांच्या नांवाचीं देखील **लक्ष्मणावती** ( **लखनौ** ), व **कुशपुर** ( कसूर ), अशीं शहरें त्याच प्रांतांत असून, त्यांवर ते राज्य करीत होते. आणि ह्या ऐतिहासिक गोष्टींविषयीं लेखही आहे. तेव्हां **लाहोर** हेंही **लहूनें** वसविलें असेल, असें मानण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

उत्खंड.

**सिंधुनदीच्या** उत्तर किनाऱ्यावर **अटक** शहरापासून सुमारें साडे सात कोसांवर, **ओहिंद** नामक जें हल्लीं गांव आहे, त्यालाच पूर्वीं **उत्खंड**[1] असें म्हणत. येथून अजमासें आठ कोसां-

---

1. Cunningham's Ancient Geography of India. P. P. 52–57.

वर **राणीघाट** नांवाचा किल्ला **महाबन** डोंगरावर असून, त्यावर सुंदर मंदिरें, विध्वस्त गृहें, आणि ठिकठिकाणीं योगीजनांच्या गुहा, इत्यादि दृग्गोचर होतात.

जालंधर.

**शतद्रु** ( सतलज ) नदीच्या कांठीं, पश्चिमेच्या बाजूला जो प्रांत आहे त्यापैकीं कांहीं भागाला **जालंधर** अशी संज्ञा प्राचीनकाळीं होती. पुराणांत ह्या प्रांताची **त्रिगर्त** या नांवानें प्रसिद्धि आहे. व मुसलमानी अमलांत त्याला **कांग्रा** किंवा **नागरकोट** म्हणत. जालंधर ऊर्फ कांग्रा राजांचें घराणें फार पुरातन व **सोमवंशी** असून, प्रचंड **भारती**-युद्धांत ते **कौरव**पक्षाचे होते. हें घराणें थेट **महमूद गिझ्नी**च्या कारकीर्दीपर्यंत चालत आलें होतें; व त्यानेंच तें अगदीं रसातलास पोहोंचविलें.

चंपावती.

**रावी**नदीचा उगमप्रदेश, आणि **चीनाब** नदीचा उर्ध्व प्रांत, यांच्या दरम्यानच्या टापूला **चंपा** किंवा **चंपावती** हें नांव असून, **वर्मपूर** ही त्याची राजधानी होती. ह्या ठिकाणीं एक पितळ्याचा नंदी, आणि नवव्या किंवा दहाव्या शतकांतील भव्य व सुंदर देवालयें, अजूनही दृष्टीस पडतात.

---

1 Cunningham's Ancient Geography of India. P. P. 60-78.

2. Cunningham's Ancient Geography of India P. P. 141.

लाहोर जवळ सतलज आणि रावी यांच्या दरम्यान जो प्रदेश आहे, त्यालाच मद्रदेश[1] ही संज्ञा असल्याविषयीं अनेक आधारावरून कळून येतें. हिमालय, उपगिरि, गंगा, सरस्वती, यमुना, आणि कुरुक्षेत्र, या पांचाबाहेर पांच नद्यांच्या जवळचा जो पश्चिमेकडील भाग, तोच मद्रदेश असल्याविषयीं भारतांत देखील आधार सांपडतोः—

मद्रदेश.

आमत्स्येभ्यः कुरुपांचालदेश्या
आनैमिष्याच्चादयो ये विशिष्टाः ।
धर्मपुराणमुपजीवंतिसंतो
मद्रादृते पांचनदांश्च जिह्मान् ॥ १६ ॥
त्वंतस्य गोप्ताच जनस्य राजा
षड्भागहर्ता शुभदुष्कृतस्य ।

( भारत. कर्ण. अ. ४९ ).

ह्या देशाची राजधानी शाकल ही असून, तेथें पांडवांच्या वेळीं शल्य राजा राज्य करीत असे. सहदेवाच्या दक्षिणेकडील दिग्विजयांत मद्रदेशाचें नांव कोठेंही आल्याचें आढळून येत नाहीं. त्यावरून, सदरहू मद्र देश दक्षिणेंतील

त्याची राजधानी.

१ प्रोफेसर लॅसनूचा नकाशा. ( प्राचीन भरतखंडासंबंधीं ). Cunningham's Ancient Geography of India. P. P. 148-150.

सुप्रसिद्ध **मद्रास** नसून, तो देश उत्तरेकडीलच असावा यांत संशय नाहीं. शिवाय **सिंधु**, **पंचनद**, **रामठ**, **बर्बर**, **पल्हव**, **मद्र**, वगैरे देश **नकुळानें** जिंकले असल्याविषयीं त्याच्या दिग्विजयांत असून, सदरहू देश **भरत**खंडाच्या उत्तर आणि पश्चिम भागांतच असल्याचें प्रमाण सिद्ध आहे. **मद्र**देशाला " **ताकदेश** " अशी संज्ञा **हूणसंग**, **आरिअन**, **सुलेमान**, **मसूदी**, **कझविनी**, यांच्या लेखांत दिलेली आढळते. व **शाकल** येथील लोकांस **मद्राः**, **वार्तिकाः**, **वाहिकाः**, **अरभाः**, **ताकाः**, अशीं नांवें **महाभारतांत** व **हेमचंद्र** कोशांत दिलेलीं दिसून येतात.

त्याची लिपी.

हल्लीं, **यमुनेपर्यंत** जी **नागरी** नांवाची लीपि आढळते, तिलाच पूर्वी **ताकरी**लिपी म्हणत. **काश्मीर**, **कांग्रा**, आणि **सतलज**, यांच्या पूर्व भागाला, व **सिंधु** नदीच्या पश्चिम दिशेला, दुकानांतील हिशेब **ताकरी**लिपींतच लिहिलेले दिसून येतात.

मूलस्थान.

**मूलस्थान** ( ज्याला हल्लीं मुलतान म्हणतात तें ) पूर्वी **रावी** नदीच्या कांठीं होतें. परंतु नदीच्या प्रवाहाचें स्थलांतर झालें असलयामुळें, **मुलतान**, व सांप्रतचें **रावीचें** पात्र, ह्यांत पंधरा कोसांचें अंतर पडलें आहे. या शहराला कश्यपपुर, हंसपुर, सांबपुर, प्रल्हादपुर, आद्यस्थान, आदित्यपुर, अशींही नांवें असून, **हिकाँटियस्**, **हिराँडटस्**,

आणि टालेमी, हे आपल्या ग्रंथांत त्याला यथानुक्रमें " कश्यपुरास्, " " काश्यटुरास्, " व " कश्पीरा " असें म्हणतात.

महानद सिंधु, व दुसऱ्या पांच नद्या.

प्रसिद्ध पांच नद्यांच्या प्रदेशाला **पंजाब** ही संज्ञा असून १ **सिंधु**, २ **वितस्ता** ( जेहेलम ), ३ **इरावती** ( रावी ), ४ **चंद्रभागा** ( चिनाब ), आणि ५ **विपाशा** ( विया ), ह्या त्यांतील प्रमुख पैकीं नद्या होत. आतां राहिलेली ( ६ ) सहावी **शतद्रु** (सतलज) किंवा **हैमवती** नदी, ही देखील इतिहासप्रसिद्धच आहे.

सिंधु नदीचें पात्रान्तर.

**सिं**धूच्या पूर्वींच्या व हल्लींच्या पात्रांत इतका फेरबदल झाला आहे कीं, भूगर्भशास्त्रवेत्त्यांच्या मतें, त्यांत सुमारें १५० कोसांचें अंतर पडलें असावें. ह्याचें कारण काय असावें अशाविषयीं शोध करतां असें कळून येतें कीं, विषुववृत्ताकडे वाहत जाणाऱ्या नद्या, पृथिवीच्या ( पश्चिमेकडून पूर्वेकडील ) दैनंदिनगतीच्या योगानें, आपापले पश्चिम किनारे विसृत करून क्रमशः त्याच दिशेकडे आपला ओघ फिरवितात.

जेहेलम नदीला प्राचीन कालीं **वितस्ता** असें ह्मणत.

1. Cooke's Geology.

वितस्ता नदी.

**ग्रीक** लोकांनीं तिला 'हिडॉस्पीस' (Hydaspes) अशी संज्ञा दिली असून, शिकंदरांच्या वेळीं तिला **बेदिस्ता**[2] असें ह्मणत असत. त्याचाच अपभ्रंश "चेलमे" असा होऊन, त्याचें सांप्रतचें स्वरूप **जेहेलम** असें झालेलें आहे. तत्संबंधीं **मत्स्य** पुराणांत जी हकीकत आहे त्यावरून **वितस्ता** हीच सांप्रतची **जेहलम**, असें सिद्ध होतें.

तैर्विमिश्रा जानपदा आर्या म्लेंच्छाश्च सर्वतः ।
पिबंति बहुला नद्योगंगा, **सिंधुः, सरस्वती** ॥ २० ॥
**शतद्रुश्चंद्रभागाच यमुना शरयू** तथा ।
**ऐरावती वितस्ता** च विशाला देविकाकुहूः ॥ २१ ॥
**गोमती** धौतपापाच बाहुदा च **दृशद्वती** ।
**कौशिकी** तु तृतीया च निश्चला **गंडकी** तथा ॥
इक्षुर्लौहितमित्येता **हिमवत्** पार्श्वे निसृताः ॥ २२ ॥

मत्स्यपुराण अ. ११३.

इरावती.

**रावी** नदीला पूर्वी **इरावती** म्हणत असून, तिच्या-काठीं हल्लीं **लाहोर** नांवाचें सुप्र-सिद्ध शहर आहे. **ग्रीक** लोकांनीं

---

1. Indian Antiquities. vol. I.

२ ऐनी अकबरी. भाग २ पान २३२.

Indian Antiquities by Thomas Maurice vol. I. P. P. 144-145.

हिला " हिड्राओटीस " ( hydraotis ) असें नांव दिलें होते. स्ट्रेबो[1] व एरिअन्, हे तिला " इराती " आणि " इद्रावती " अशी संज्ञा देत असून, टालेमी तिला " रादि " असें म्हणतो. यावरून **इरावतीचें रावी हें** कसें रूपांतर झालें, हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

चंद्रभागा.

**चिनाब**ला प्राचीन काळीं **चंद्रभागा** हें नांव असून, **ग्रीक** लोकांनीं तिला " चण्डेबगीस " असें नांव दिलेलें आढळतें. आतां चंद्रभागा हें नांव **भीमा** नदीलाही आहे. परंतु ज्या अर्थी **भीमा हिमालय** पर्वतापासून निघत नाहीं, त्या अर्थी, त्या पर्वतापासून निघालेली **चंद्रभागा** हीच सांप्रतची **चिनाब** होय, यांत बिलकुल संशय नाहीं.

विपाशा.

**बिया** नदी पूर्वी **विपाशा** या नांवानें प्रसिद्ध असून, तिला **टालेमीनें** " बिपासिस् " आणि ऐनी अकबरींत " बिपाशा ", अशी संज्ञा दिल्याचें आढळून येतें. ह्या नदीविषयीं एक अशी **पौराणिक** आख्यायिका आहे कीं, **वासिष्ठाचे** शंभर पुत्र **विश्वामित्रानें** ठार मारविल्यामुळें, तो आगदीं शोकाकुल होऊन दुःखाग्नींत पडला. तेव्हां त्या दुःसह यातना त्याला सहन न झाल्या

1. Indian Antiquities. vol. I. P. 147.

२ भारत. वनपर्व. अ. १३० .

**इंद्रप्रस्थ** ( ज्याला हल्लीं दिल्ली म्हणतात तें ) **यमुना** नदीच्या तटीं असून, **कुरु** देशाच्या राजधानीचें शहर होतें. ह्याच्या भोंवताली **खांडवप्रस्थ** नामक अरण्य होतें; व तें **धृतराष्ट्रानें पांडवांस**, आपल्या पुत्रांबरोबर कलह उत्पन्न होऊं नये एतदर्थ, दिलें होतें. **पांडवांनीं** ह्या ठिकाणीं सर्वोत्कृष्ठ शहर वसविलें, व त्यामुळें त्यास **शक्रप्रस्थ** असेंही लोक म्हणूं लागले. **मयासुर** सभा, **राजसूययज्ञ**, वगैरे अनेक इतिहासप्रसिद्ध गोष्टी, याच ठिकाणीं घडून आल्या होत्या.

इंद्रप्रस्थ.

**हस्तिनापूर** हें सांप्रतची **दिल्ली** नसून, तें **मीरत**च्या पुर्वेस एका स्वतंत्र राजधानीचें शहर होतें. व हें **पुरुकुलांत** उत्पन्न झालेला **सोम**वंशी नामक **हस्तिराजानें** स्थापिलें होतें.

हस्तिनापूर

**बृहत् क्षत्रस्य पुत्रोभूद्धस्ती यद्धास्तिनापूरम् ॥**
( भागवत. स्कन्ध ९. अ० २१. श्लो० २० )

**यमुनेला** पूर येऊन ज्याप्रमाणें इंद्रप्रस्थाची अवस्था झाली, त्याचप्रमाणें **भागीरथीला** महापूर येऊन, **निमि**-राजाच्या कारकीर्दीत हस्तिनापुराचीही दशा झाली. मात्र इतकेंच कीं, **इंद्रप्रस्थावर** पुनश्च **दिल्ली** शहर वसलें गेल्यामुळें, त्याचा बोलबाला तसाच अप्रतिहत राहिला. आणि हस्तिनापुराच्या संबंधानें तशी गोष्ट घडून आली नाहीं, त्यामुळें तें वस्तिहीनच राहिलें.

**वैराट** ( किंवा **विराट** ) ही **मत्स्य**[1] देशाची राजधानी असून, ती दिल्लीच्या आग्नेयी दिशेस आहे. हें शहर, मध्यंतरीं कित्येक दिवस ओसाड पडून, **अकबराच्या** कारकीर्दीत तें पुनश्च उदयास आलें. प्राचीन **विराट** नगरावर **महम्मदानें** इ० स० १०२२ सालीं स्वारी केली. त्यावेळीं **नारायणपुर**, या गांवाचा संहार होत असतांना, एक अति पुराण शिलालेख सांपडला. त्यावरून[2] असें कळून येतें कीं, त्या गांवांतील तें **नारायणाचें** देवालय, आणि तो शिलालेख, असे चाळीस हजार वर्षांपूर्वीचे अतिप्राचीन असावेत. सांप्रतच्या **विराट** नगराची वस्ती वर्तुलाकृति असून, त्याच्या भोंवताली रक्तवर्ण शैलपाद आहेत. **वैराट** हें तांब्याच्या खाणीविषयीं पूर्वींपासून सुप्रसिद्ध आहे.

वैराट.

**मथुरा** येथें पूर्वीं अरण्य असून, तें **मधु** नामक राक्षसानें वसवून त्याला **मधुपुरी** असें नांव दिलें. त्या ठिकाणीं **शत्रुघ्न** हा राज्य करूं लागल्या कारणानें, त्या देशाला **शूरशेन** असें नांव पडलें, व **मधुपुरी** ही त्याची राजधानी झाली.

मथुरा.

**मथुरेच्या** उत्तरेस, सुमारें तीन कोसांवर **यमुनेच्या** कांठीं, **वृंदावन** हें फार प्राचीन व **पुराणप्रसिद्ध** नगर

---

१ भारत. व मत्स्यपुराण.

२ भरतस्थलादर्श.

वृंदावन.

आहे. हें पूर्वी 'बन' असून त्यालाच कालिकावर्त[1], किंवा कालियावर्त[2], अशी संज्ञा आहे. कारण, त्या ठिकाणीं कालिया मर्दनाचा, व कृष्णाचा, पुराणप्रसिद्ध असा प्रसंग घडून आला होता. सुमारें शंभर वर्षांमागें, चेतसिंग नामक बनारस येथील राजानें यमुनेंतील कालिया डोहांत हजारों हांडे दूध, मथुरा आणि वृंदावन येथें जितकें ह्मणून मिळालें तितकें जमवून ओतलें होतें. तथापि, त्या पाण्याच्या रंगांत लेशमात्र देखील बदल झाला नाहीं, असें सांगतात[3].

कनोज.

कनोजाला पूर्वी कान्यकुब्ज असें म्हणत. त्याविषयीं अशी आख्यायिका आहे कीं, या देशांतील कुशिक नांवाच्या राजाला शंभर कन्या असून त्या सर्वांचीं शरीरें वायूनें वक्र झालीं होतीं. पुढें कांपिली नगरीच्या ब्रह्मदत्त राजाबरोबर त्यांचा शरीरसंबंध झाल्यावर, त्या सर्वांचीं शरीरें चांगलीं नीट झालीं. तथापि, सदरहू मुलींच्या वक्र शरीराच्या संबंधानें त्या नगराला कान्यकुब्ज म्हणून जें एकदां नांव पडलें तें पडलेंच. ह्या शहराची प्राचीनकाळीं भरभराटी होती.

---

१ भागवत. स्कंद १० . अ० १२.

२ भागवत. दशम स्कंध. अ० १६.

३ कनिंगह्यामकृत भुगोळ. पान ३७५.

" " ३२. ३३.

**अयोध्या** नगराला **साकेत**, **विशाख**, किंवा **शाचि**, अशीं नांवें असून, त्याची लांबी १२ योजनें ह्मणजे ४८ कोस असल्या-विषयीं जें **रामायणां**त लिहिलें आहे तें, **हूणसंग** यांनं तत्संबंधीं सातव्या शतकांत जो वृत्तांत दिला आहे, त्याच्याशीं मिळतें आहे.

अयोध्या.

**पाटणा** शहराला पूर्वीं **कुसुमपुर** किंवा **पाटलीपुत्र** असें म्हणत. हें **भागीरथी**च्या तीरीं असून **मगध देशा**ची राजधानी होतें. ह्याला **ग्रीक** लोकांनीं "पालिबोथ्रा" अशी संज्ञा दिली होती.

पाटणा.

**गया** हें शहर **फल्गू**च्या कांठीं असून, **बौद्धगया**ही ह्या नदीच्या दक्षिणतीरीं आहे.

गया.

**राजगृह** म्हणून **मगध** देशाची फार प्राचीन काळची राजधानी होती. तेथें हल्लीं देखील **राजगीर** नांवाचा विध्वस्त झालेला किल्ला दृग्गोचर होत असून, त्या स्थळास **'पुराणराजीर'** असें म्हणतात.

राजगृह.

**राजीर** नजीकच **मोदागिरि** पर्वत आहेत. हे सुमारें २५० कोसपर्यंत पसरलेले असून, त्यांचें एक टोंक थेट **पारसनाथ**पर्यंत

मोदागिरी.

जाऊन थडकलें आहे. ह्या पर्वताजवळ जिकडे तिकडे उष्णोदकाचे झरे असून, ज्वालामुखीसारखे अन्य पदार्थही त्याच्या आसपास आढळतात. **मोंगीर** हें नांव **मोदागिरी**वरूनच पडलेलें आहे.

अवंती.

**उज्जयिनी**च्या उत्तरेस सुमारें अर्ध्या कोसावर प्राचीन व इतिहासप्रसिद्ध असें **अवंती** शहर वसलेलें होतें. **भरतखंडा**तील प्राचीन भूगोलवेत्ते ह्या **अवंती** नगरीचीच [१]रेखांशरेषा मुख्य मानीत असत. ही पूर्वी **मालव** ( ज्याला हल्लीं **माळवा** ह्मणतात त्या ) देशाची राजधानी होती.

तिबेट, भुतान, इत्यादींचीं प्राचीन नांवें.

**हिमालया**च्या पलीकडील देश जो **तिबेट**, त्याला पूर्वी **त्रिविष्टप** अशी संज्ञा असून, **भुताना**ला **भौत्यदेश** असें ह्मणत असत. लुधियनाला **वारणावती** असें प्राचीन नांव होतें, व याच ठिकाणीं पंच **पांडवांस** दहन करण्यासाठीं **दुर्योधनानें** लाक्षागृहाची योजना केली होती. हल्लीं ज्या शहराला आपण **आग्रा** असें ह्मणतों त्याला **यमप्रस्थ**, मिदनापुराला **मेदिनीपुर**, अजमीराला **अवभूतिपुरि**, आणि बरद्वानला **वर्धमान**, अशीं नांवें प्राचीन काळीं प्रचारांत होतीं. बरद्वान येथेंच **मीरतंग** नांवाच्या **जैन** पंडितानें **प्रबोध चिंतामणि** ग्रंथ रचला असल्याचें सांगतात.

---

१ आर्यविद्या सुधाकर.

आतां, पूर्वी केलेलें विवेचन थोडक्यांत चांगलें समजण्याकरितां, प्राचीन स्थितीप्रमाणें, **मध्यदेशाचे** पांच विभाग कल्पून, त्यांच्या राजधानीचीं शहरें येथें देतों. १ **कुरुक्षेत्र** ( राजधानी इंद्रप्रस्थ ); २ **उत्तर कोसल** ( राजधानी अयोध्या ); ३ **मिथिलविदेह** ( राजधानी मिथिला ); ४ **मगध** ( राजधानी पाटलीपुत्र ); आणि ५ **मालव** ( राजधानी अवंती ).

मध्यदेशाचे पांच विभाग, व त्यांच्या राजधान्या.

**प्राचीः**—ह्या प्रदेशांत १ **अंगदेश**, २ **वंगदेश**, ३ **पुंड्रदेश**, ४ **सुह्मदेश**, ५ **कामरूप**, आणि ६ **लौहित्य** यांचा समावेश होतो.

प्राची देश व त्यांतील प्रांत.

**अंग देश** हा **भरतखंडाच्या** पूर्व भागालाच असल्याविषयीं, **पौराणिक** इतिहासावरून खात्रीपूर्वक कळून येतें. कारण, **धर्मराजाच्या** आज्ञेवरून, **भीमसेन** हा ज्या वेळीं **दिग्विजय** करण्याकरितां पूर्वभागाला गेला, तेव्हां त्याला प्रथम **मगधदेश**, नंतर **अंगदेश**, व तदनंतर **वंगदेश**, याप्रमाणें अनुक्रमानें लागले. मत्स्यपुराणांत देखील **अंगदेशानंतरच**, पूर्वेकडील इतर देशांचें वर्णन केलें आहे.

अंग देश.

---

१ मत्स्यपुराण. अ० ११३.

२ भारत सभापर्व. अ० ३०.

**अंगावंगा** मद्गुरका अंतर्गिरि बहिर्गिरि॥ ***
प्राग्ज्योतिपाश्चा **पुंड्राश्च** ***
प्राच्या जनपदाःस्मृताः ॥ ४९ ॥

सुप्रसिद्ध योद्धा व अनुपम दाता जो **कर्ण**, तो याच देशाचा राजा असल्यावरून, त्याला **अंगराज** अशी देखील संज्ञा आहे. **बंगाल** प्रांताच्या वरच्या भागाला **अंगदेश**, आणि खालच्या भागाला **वंग** देश असें ह्मणत. ह्याला **अंगदेश** असें नांव पडण्याच्या संबधानें अशी आ-ख्यायिका[1] आहे कीं, **शिवशापानें मदन** हा भस्मसात् झाल्यावर, त्याला पुनः **शंकराच्या** प्रसादानें ह्याच देशांत देह प्राप्त होऊन, तो सांग झाला. आणि त्या कारणानेंच ह्या देशाला **अंगदेश** असें नांव पडलें. ह्याला **कामाश्रम**[2] असेंही नांव असून, त्याची राजधानी **चंपा**[3] होती.

**वंग देश** म्हणजे **बंगाल** प्रांतच होय, असें **भारता**-

वंग देश.

वरून उघड दिसतें. **कलकत्त्याच्या** नैर्ऋत्येस **हुगळी** नदीच्या संगमा-पासून सहा कोसांवर **ताम्लुक** नांवाचें जें सांप्रतचें शहर आहे, त्यालाच पूर्वी **ताम्रलिप्त** असें ह्मणत. **आराकान**

---

१ वाल्मिकी रामायण. बालकांड. सर्ग २३.

२ भारतीय प्रा. ऐ. कोश. पा २.

३ भार. सभा पर्व. अ. ३०.

४ हूणसंग प्रवास भरतखंड वर्णन.

प्रांतांत **चितागांग** ह्मणून जें शहर आहे त्याला पूर्वी **चतुरंग्राम** अशी संज्ञा होती.

पुंड्र देश.

**बहार** प्रांतानजीक, **अंग** आणि **वंग** यांच्या दरम्यानचा जो प्रदेश, त्याला **पुंड्र देश** अशी संज्ञा होती. **सोम**वंशांतील राजा जो **बलि**, याच्या सहाव्या मुलाचें नांव **पुंड्र** असें असून, त्यावरूनच हें नांव ह्या देशाला पडल्याचें दिसतें. **पांडवा**-च्या वेळीं, येथें **पौंड्रक** वासुदेव या नांवाचा राजा राज्य करीत असल्याचें, **भारता**वरून कळून येतें.

सुह्म देश.

**सुह्मदेश** हा **बंगाल** आणि **ओरिसा** या दोन प्रांतांच्या दरम्यानचा प्रदेश असून, **बली**-चा चौथा पुत्र जो **सुह्म** तो ह्या प्रांतावर राज्य करीत असल्यावरून, त्याचेंच नांव ह्या देशाला पडलें असावें असें वाटतें. ह्या देशाची गणना पूर्वेकडील प्रदेशांतच होत असल्याचें, खालीं लिहिलेल्या आधारावरून उघड दिसतें.

अंगावंगामद् गुरका अन्तर्गिरि बहिरार्गिरी ।
**सुह्मो**त्तराः प्रविजया मार्गवागेय मालवाः ॥ ४४ ॥
( मत्स्यपुराण. अ. ११३ ).

**कामरूप** हें नांव **आसाम** प्रांताच्या ज्या भागांतून **ब्रह्मपुत्रा** नदी वाहते त्याला असून, **लौहित्य** देश ह्मटला

---

१ प्रो. लॅसनकृत भरतखंडवर्णनालेख्य.

कामरूप व लौहित्य देश.

म्हणजे **आसाम** आणि **आराकान** यांच्या दरम्यानचा पूर्व पश्चिम प्रदेश होय. **लोहिता** नदीवरूनच हें नांव ह्या देशाला पडलें असावें. ही नदी **हिमालयांत** उगम पावते.

इक्षु**र्लोहित** मित्येता हिमवत पार्श्व निसृताः ॥ २२ ॥
( मत्स्यपुराण अ. ११३. )

**आसाम**च्या दक्षिणेस २६ अक्षांशाच्या सुमारास जो मोठा पर्वत आहे, त्याला पूर्वी **मंदराचल** अशी संज्ञा होती, व ह्यालाच हल्लीं **ग्यारोज** पर्वत असें म्हणतात. ह्याच्या उत्तरेस **कामरूप** आणि आग्नेयी दिशेस **लौहित्य** नामक देश असून, मंथन समयीं ह्याची **मंथनदंडाच्या** कामीं ( घुसळखांबाऐवजीं ) योजना झाली होती, अशी पुराणप्रसिद्ध आख्यायिका आहे.

प्रतीची विभाग व त्यांतील प्रांत.

**प्रतीचीः**—ह्या भागांत १ **सिंधु** देश; २ **कच्छ;** ३ **गुर्जर;** ४ **राजस्थान;** आणि ५ **सुराष्ट्र;** या प्रदेशांचा समावेश होतो.

सिंधु देश.

ज्याला आपण हल्लीं **सिंध** प्रांत म्हणून म्हणतो, त्यालाच पूर्वी **सिंधु** देश अशी संज्ञा होती. ह्या देशाच्या पश्चिमेस **रामठ** देश असून, त्याला **रामठ** असें नांव, तेथें हिंग उत्पन्न होत असल्यावरून, पडलें असावें.

---

१ भारत सभापर्व. अध्याय ३२.

२ भ. प्रा. ऐ. को. पान ४९३.

**महोर्धग्राम,** ज्याला सांप्रतकालीं **महोर्ती** असें ह्मणतात तो, शिकारपुराच्या दक्षिणेस एका उच्च प्रदेशावर, असून, त्याच्या पश्चिमेकडील मैदानास **प्रस्थली** अशी संज्ञा होती. ह्यालाच **ग्रीक** लोक ' प्रेस्टी ' असें म्हणत.

महोर्धग्राम.

**खैरपूरच्या नैर्ऋत्येस शेवान ( सैंधुस्थान )** नामक शहर असून, त्याच्या दक्षिणेस **ब्राम्हणस्थल** ( ब्राह्मणाबाद ) आहे. ह्याला **ग्रीक** लोक " हार्माटेलिया" असें ह्मणत. कारण " हर्मीज" ( Hermes ) याचा अर्थ **ग्रीक** भाषेंत सृष्टि-कर्ता असा असल्यामुळें, तदर्थव्यंजक असेंच नांव त्यांनीं या नगरीस दिलें. मुसलमानी अमलांत **ब्राह्मणस्थलाला ब्राह्मणाबाद** असें ह्मणत. ह्याचेंच सिंदीभाषेंत " बामि-वान" असें रूप झाल्याचें दिसतें. मसुदी आणि हॉकेल, यांनीं हें शहर इ० स० ९९० सालीं पाहिलें असल्या-विषयीं, त्यांच्याच ग्रंथावरून समजतें. परंतु, तदनंतर भू-कंपासारख्या आकस्मिक आणि घोरतर आघातांनीं तें शहर लवकरच विलायास गेलें असावें, असें भुगर्भान्वे-क्षणावरून अनुमान होतें.

सैंधुस्थान.

**पाटशिला, पीतशिला,** किंवा **पाटलपुर,** असें सिंध हैदराबादेला नांव होतें. शिवाय, **मिथ-नकोट** अशी देखील त्याला संज्ञा होती.

पाटलपुर.

कच्छ प्रांत.

**कच्छ** या शब्दाचा अर्थ "सखल, व पाणथल प्रदेश" असा असल्यामुळें, तद्व्यंजक असें नांव, **सिंधु** नदीच्या मुखाजवळील प्रांताला पडलें आहे. **कच्छे** प्रांतांत **अघोरा** नदीच्या दरींतील दोन गुहांमध्यें **काली** आणि **हिंगुला** नामक देवींचीं देवालयें असून, तेथें **रामचंद्राचा सीते**-सहीत मुक्काम असल्याचें सांगतात. ह्या नदीच्या पात्रांतच एक डबकें असून त्याला "रामचंद्रवापी" किंवा "रामचन्द्रकूप" असें अति प्राचीन नांव आहे.

गुर्जर प्रांत.

**गुर्जर** हें नांव **राजपुतान्या**च्या दक्षिणेकडील भागाला असून, त्या ठिकाणीं पूर्वीं **हुजर** नांवाचे राजे राज्य करीत असल्यावरून, त्या प्रांताला **हुजर** असें नांव पडलें; आणि त्याचाच पुढें "जुजर" व "गुजर" असा अपभ्रंश झाला. अद्यापि देखील, त्या प्रांतांत **हुजर** जातीचे संस्थानिक कोठें कोठें आहेत. त्यावरून, **गुर्जर** ह्मणजे **गुजराथ** असा जो सर्वांचा समज आहे तो चुकीचा आहे, असें कित्येकांचें ह्मणणें आहे; आणि हल्लींचा जो **गुजराथ** प्रांत तो पूर्वींचा **सौराष्ट्र** देश होय, असें ते प्रतिपादन करितात.

---

१ मत्स्यपुराणांत नर्मदेजवळील प्रदेशांत याचें वर्णन आहे. ( भरतस्थलादर्श. )

२ कॅनिंगह्यामकृत प्राचीन भरतखंड.

आदर्शावलि व अर्बुद पर्वत.

**विंध्याद्रीच्या** पश्चिम टोंकापासून तों **दिल्लीपर्यंत** जी विस्तीर्ण पर्वताची पंक्ति आहे, ती **राजपुतान्यांतून** गेली असून, तिला **आदर्शावलि** असें प्राचीन नांव होतें. हल्लीं तिलाच **अरवली** अशी संज्ञा आहे. ह्या पर्वतांत ठिकठिकाणीं नानाप्रकारच्या धातूंची चित्रविचित्र रचना दृग्गोचर होत असल्यामुळें, ही आदर्शाची जणुकाय पंक्तीच आहे कीं काय, असें भासमान झाल्या कारणानें त्याला हें नांव पडलें; व त्याचाच सांप्रतकाळीं **अरवली** हा अपभ्रंश झाला. ह्या पर्वताच्या नैर्ऋत्य भागाला **अर्बुद** अशी संज्ञा आहे, आणि त्यालाच हल्लीं **अबु** किंवा अबूचा पहाड असें ह्मणतात.

राजस्थान.

**राजस्थान** हें नांव, **सिंधु** देशाच्या पूर्वेस **राजपुताना** ह्मणून जो हल्लीं प्रांत आहे त्याला असून, त्याच्या उत्तरदक्षिण पट्टीला **मरुस्थल**, किंवा **मरुभूमि**, अशी संज्ञा होती. हा प्रांत रुप्याच्या खाणीविषयीं प्राचीन काळापासून फार प्रसिद्ध आहे.

**सुराष्ट्र**[1] ही संज्ञा पूर्वी, सांप्रतच्या **गुजराथच्या** द-

---

१ काच्छिकाश्चैव सौराष्ट्रा आनर्ता अर्बुदैःसह ॥

( मत्स्य पुराण. अ. ११३. )

महाभारत. ( सभापर्व. अ. ३१. कर्णपर्व अ. ३५ ).

क्षिणेकडील अर्ध्यापेक्षांही अधिक भागाला असून, त्याचेंच **सुरथ** हें रूपांतर, इसवी सनाच्या सातव्या शतकांत, झालें असल्याविषयीं सांगतात. **सुरथ** ह्याचाच अपभ्रंश **सुरत** असा झाला असून, तें इतिहासप्रसिद्ध शहर सर्वांस महशूर आहे.

सुराष्ट्र.

**बलभद्र** किंवा **बल्लभिपुरा** ह्या नांवाचें शहर **गुजराथे**च्या पूर्व किनाऱ्यावर **भागानगरा**जवळ होतें. तें इ० स० ६४० नंतर विलयास गेलें असावें असें वाटतें. कारण, ह्यूणसंग नामक **चिनी** प्रवाशानें त्याचा उल्लेख केला असल्यामुळें, तो **हिंदुस्थानां**त असते वक्तीं तें जागेवर होतें, यांत शंका नाहीं.

**सुरते**च्या दक्षिणेस चाळीस कोस दूर, **अर्जुनगड** नांवाचा किल्ला **बगवाडें** गांवांत असून, तेथून सुमारें अडीच कोसांवर **कुंतिभोज** राजाचें **कुंतलपुर** नामक नगर होतें. हल्लीं त्या ठिकाणीं **रुक्मिणी**चें देवालय असून, तेथें कृष्ण व रुक्मिणी यांचें लग्न झालें असल्याविषयीं आख्यायिका आहे.

अर्जुनगड, व कुंतलपुर.

**भृगुक्षेत्र**, भृगुपुरा, भृगुकक्ष, आणि भृगुकच्छ, अशीं नांवें हल्लींच्या **भडोच** शहराला होतीं, व तीं सर्व **भृगुऋषीं**च्या आश्र-

भृगुक्षेत्र

मावरूनच पडली, ह्यांत तिलमात्रही शंका नाहीं. हें प्रसिद्ध क्षेत्र **नर्मदे**च्या कांठीं असून, ह्या पवित्र नदीच्या तीरीं ऋषींचीं तप करण्याचीं, व विश्रांतीचीं, अनेक सुरम्य स्थलें आहेत. **बडोद्या** ( प्राचीन **वटोदर** किंवा **वटपद्र** शहरा ) पासून सुमारें वीस कोसांवर **व्यास, शुक,** आणि **अनुसूया,** हीं विशेष प्रख्यात ठिकाणें असून, एकांतवासांत राहून शांतिसुख लुटण्याचीं तीं केवळ माहेरघरेंच होत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

अर्बुद पर्वत.

**अरवली** पर्वताच्या नैर्ऋत्येस जो भाग आहे, त्याला पूर्वी **अर्बुद** असें नांव असून, त्याला सांप्रतकाळीं अबूचा पहाड म्हणतात. ह्याची उंची जमिनीच्या सपाटीपासून ५६५३ फूट आहे, व त्यावर **जैन** लोकांची अप्रतीम आणि सुंदर देवालयें आहेत.

दाक्षिणापथ विभाग, व त्यांतलि प्रांत.

**दक्षिणापथः**—यांत १ **दक्षिण** कोसल; २ **विदर्भ** ( वऱ्हाड ); ३ **कालिंग;** ४, **महाराष्ट्र;** ५ **केरल;** ६ **चोल;** ७ **पांड्य;** आणि ८ **निरक्षदेश** ( **सिंहद्वीप** किंवा **लंका** ); यांचा समावेश होतो.

दक्षिणकोसल आणि विदर्भ.

**विंध्याद्रीच्या** दक्षिणेकडील भागाला **दक्षिणकोसल** अशी संज्ञा असून, हा प्रांत ह्या पर्वतानें घेरलेला असल्याविषयीं **रत्नावलींत** वर्णन आहे. जो देश

"**वऱ्हाडप्रांत**" या नांवानें हल्लीं सुप्रसिद्ध आहे, त्यालाच पूर्वी **विदर्भ** असें ह्मणत.

**ऋष्यवत्** पर्वत हा **भरतखंडां**तील प्रसिद्ध अशा सांत[1] पर्वतांपैकीं एक असून, तो **गोंडवण** प्रांताच्या वायव्येस व **नर्मदा** नदीच्या दक्षिणेस सुमारें २२ अक्षांशावर आहे. ह्यालाच **पाश्चात्य** लोक **ऋक्षवत्** असें ह्मणतात. अर्वाचीन भुगोलांत त्याची गणना **विंध्याद्रीं**त, किंवा **अमरकंटक** पर्वताच्या पश्चिम दिशेस जे **महाल** नांवाचे पर्वत आहेत त्यांत होत असावी, असें वाटतें.

कलिंग् देश, अथवा तेलंगण.

**कालिंगदेश**[2] म्हटला म्हणजे **महानदी** आणि **गोदावरी** यांच्या दरम्यानचा पूर्व किनाऱ्यावरील प्रदेश होय. ह्यालाच हल्लीं सरकार अशी संज्ञा आहे. **राजमहेंद्री** ही या देशाची कांहीं दिवस राजधानी होती, व त्या ठिकाणीं **चालुक्य** घराण्यांतील राजे कांहीं कालपर्यंत राज्य करीत होते. इ० स० ७५० सालीं, यांची गादी येथें स्थापन झाली असल्याविषयीं **कनिंगह्यामचें**[3] मत

---

१ हे सात पर्वत खालीं लिहिलेले होतः—

१ हिमालयाद्रि, २ विंध्याद्रि, ३ सह्याद्रि, ४ महेन्द्र, ५ मलय, ६ भुक्तिमान पर्वत, आणि ७ ऋक्षवान पर्वत.

२ भा. प्रा. ऐ. कोश. "तेषांपरे जनपदा दक्षिणापथवासिनः ।
नव राष्ट्रामाहिषिकाः कालिंगाश्चैव सर्वशः ॥ ४७ ॥
मत्स्य. पु. अ. ११३.

३ कनिंगह्यामकृत भरतखंड भूगोल. पान. ५१५-५१९.

आहे. राजपुर[1] ही कलिंग देशाची प्राचीन राजधानी असून, त्याचेंच राजमहेंद्री[2] हें रूपान्तर झालें असावें असें वाटतें. हैहय वंशांतील राजे आपणांस कलिंजरपुर, व त्रिलिंग, यांचे अधिपति म्हणवीत असून, त्रिलिंग देशांत १ कलिंग, २ वारंगळ, आणि कृष्णेवरील ३ अमरावती, असें प्रांत मोडत. त्रिकलिंग याचेंच ( त्रिलिंग, तेलिंग ) तेलंगण असें रूपांतर झालें असावें, असा शोधक लोकांचा[3] अभिप्राय आहे.

महाराष्ट्र देश.

**महाराष्ट्र** ह्मणजे मोठें किंवा पराक्रमी राष्ट्र असून, त्यांच्या राहण्याच्या ठिकाणाला **महाराष्ट्र** देश अशी संज्ञा आहे; व **मराठा** हा शब्द देखील **महाराष्ट्राचाच** अपभ्रंश आहे. **महाराष्ट्र** देशाची राजधानी **प्रतिष्ठान** पुरी होय. ह्यालाच हल्लीं **पैठण** अशी संज्ञा आहे. ह्यूणसंगच्या वेळीं ह्या शहराचा घेर अडीच कोस असल्याविषयीं त्याच्या प्रवासवर्णनावरून कळून येतें. **टालेमी** हा या शहराला

---

१ भारत शांतिपर्व. अ. ४.

२ प्रो. लासन्कृत भरतखंडालेख्य

3. Cunningham's Ancient Geography. Professor Lassen's Map of Ancient India.

4. Journal of the Bombay Branch. R. A. S. vol. XV. No. 39. P. 143.

**बैठण** ( Baithan ) अशी संज्ञा देत असून, पेरिप्लसांत *त्याला प्लिथान ( Plithan ), असें म्हटलें आहे. यावरून पैठण नगराचें ऐतिहासिक प्राचीनत्व वाचकांच्या* ध्यानांत सहजीं येईल.

त्याची व्याप्ति व सीमा.

**महाराष्ट्र देशा**ची व्याप्ति स्थूल मानानें म्हटली ह्मणजे, उत्तरेस **विंध्याद्रि** पर्वताची विस्तृत झालेली विशाल पंक्ति, पूर्वेस **पूर्वघाट**, दक्षिणेस **तुंगभद्रा** नदीच्या उगमापासून तों **कृष्णा**नदीच्या मुखापर्यंतचा वारिप्रवाह, आणि पश्चिमेस **अरबी** समुद्र. याप्रमाणें हा विशाल प्रदेश उच्चपर्वत परिवेष्टित, व सरित् समुद्रवलयांकित असून, त्याचे १ **घांट** आणि २ **कोंकण**, असे दोन विभाग आहेत.

धनकक्कट.

**धनकक्कट** हें **कृष्णा** नदीच्या दक्षिणेस असून, त्यालाच हल्लीं **धर्णीकोट** अशी संज्ञा आहे. **अबूरिहन** व **सुलेमान** व्यापारी हे येथें इ० सनाच्या अकराव्या शतकांत आले असून, त्यांनीं **धनकक्कट** येथील बारीक वस्त्रांविषयीं फार तारीफ केली होती. ते असें लिहितात कीं, अंगठींतून वस्त्र काढून घ्यावें, इतके सूक्ष्म आणि मुलाईम तंतु या ठिकाणीं निघेतात.

---

१ Antiquities of पैठण. Cunningham's Geography.

2 Professor Lassen's Map of Indian Antiquities. Cunningham's Ancient Geography. P. P. 530--544.

**विद्यानगर, विजयनगर,** किंवा **हंपी,** यालाच **अनागोंदी** असें नांव आहे. हें पुरातन नगर **बल्लारी** परगण्यांत **तुंगभद्रा** नदीच्या कांठीं असून, तें **हरिहर** राजानें स्थापिलें होतें, असें शोधाअंतीं कळून येतें. **विजयनगर** येथील तळ्यास **पंपा सरोवर** हें नांव अद्यापीही चालत आहे. **तुंगभद्रा** नदीला **पंपा** असें नांव असल्याविषयीं कांहीं शोधक पंडितांचें म्हणणें आहे, व हेंच नांव सरोवराला पडलें असून **पंपा** ह्याचेंच **हंपा** व **हंपी** असें **कानडी** भाषेंत रूपांतर झालें आहे. ह्या सरोवराजवळील एका टेंकडीला ऋष्यमूक[1] असें नांव असून, तें अद्यापि देखील परिपाठांत आहे. त्यामुळें, **वाल्मिकी** रामायणांतील **अरण्यकांडां**तलें **पंपा** सरोवर आणि ऋष्यमुख पर्वत, हीं **विजयानगरां**तीलच असावींत, असा **प्राच्य** व **पाश्चात्य** पंडितांचा अभिप्राय आहे. **अनागोंदी** हें नांव **द्राविड** भाषेंतील असून, तें **हस्तिनावती** या शब्दावरूनच साधिल्याचें दिसतें. हेंच नांव **विजयनगराला** असल्याविषयीं कांहीं ताम्रपटांवरून सिद्ध होतें. **अनागोंदी** हा " अनी " व " गुंडु " यांचा अपभ्रंश असून ' अनी ' ह्मणजे हत्ती,

विजयनगर किंवा हंपी.

---

१ वाल्मिकी रामायणांतील किष्किंधाकांडांत, ऋष्यमूक हा स्वतंत्र पर्वत लिहिला नसून, तो मातंग पर्वताचें शिखर असल्याविषयीं वर्णन आहे.

आणि ' गुंडु ' म्हणजे पुष्कळ, असा कानडी भाषेंत त्याचा अर्थ होतो. आणि त्या कारणास्तवच, हस्तिनावतीला **अनागोंदी** हा अन्वर्थ शब्द योजिला असल्याचें उघड दिसतें. **अनागोंदी** किंवा **विजयनगर**, येथेंच सर्वमान्य व जगत्प्रसिद्ध **विद्यारण्य** स्वामी राहत होते, व ह्यांनींच **वेदा**वर भाष्य केलें आहे.

**विजयनगर**च्या आसमंतांत असणाऱ्या शैलपादाला, **हेमकूट** असें प्राचीन नांव असल्याचें ताम्रपटांवरून कळून येतें. हे ताम्रपट एकंदर नऊ असून, त्यांजवर सूर्यचंद्रांकित मोहोर आहे. इ० स० १३८० सालीं **हस्तिनावती** ( **अनागोंदी** ) येथें जो दुसरा **हरिहर** राजा गादीवर बसला, त्यानें **गदग** प्रांताचा कांहीं भाग अग्रहार ह्मणून **ब्राह्मणांस** दिला असून, त्याविषयीं सदर्हू ताम्रपटांत सनदेदाखल खालीं लिहीलेला कविताबद्ध मजकूर आहे.

प्राकारो हेमकूटः परिसर परिखा तुंगभद्राऽतिभद्रा
साक्षादारक्षकोयं क्षतभुवनभयः श्रीविरूपाक्षदेवः ।
राजाराजाधिराजो हरिहरनृपतिः क्षोणिकांचीचकांची
श्लाघ्यः शाखापुरश्रीः कथमिववचसांगोचरेस्यादिहास्याः ॥

**तगर** हें नांव प्राचीनकाळीं **जुन्नर** शहराला होतें.

तगर उर्फ जुन्नर.

**जुन्नर** हें फार प्राचीन शहर असून, **जीर्णनगर** ह्याचाच हा अपभ्रंश असावा असें वाटतें. येथें **लेण्याद्रि** नांवाचें **श्रीगणपतीं**चें

पुण्यस्थान असून, तेथील कोरींव लेणें प्रेक्षणीय आहे. प्रसिद्ध **लोलिंबराज** कवीची जन्मभूमि ह्या जीर्ण नगरींतच होती.

निधिवासक्षेत्र.

**निधिवास[1] क्षेत्र** हा गांव **नगर** जिल्ह्यांत असून त्यालाच हल्लीं **नेवासें** अशी संज्ञा आहे. **श्रीनिवास** असेंही प्राचीन नांव ह्या गांवाला दिलेलें आढळतें, व याच ठिकाणीं **ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरी** ग्रंथ समाप्त केला.

बारशी.

**द्वादशी[1] क्षेत्र** हें **पंढरपुरा**जवळ असून त्यालाच हल्लीं **बारशी** असें म्हणतात. हिंदुस्थानी भाषेत द्वादशीला **बारस** म्हणतात, व त्याचेंच **बारशी** हें रूपांतर आहे.

कौंडिन्यपुर.

**कौंडिन्यपुर[1]** हें शहर **कर्नाटकांत** आहे, व त्याचाच अपभ्रंश होऊन **कोंडविडु** असें तैलंगीरूप हल्लीं प्रचारांत दृष्टीस पडतें. या ठिकाणींच **अन्नंभट्टानें** न्यायशास्त्राचा अभ्यास केला होता. कुंडिनपुर नांवाची जी **विदर्भ** देशाची राजधानी होती, ती ह्या शहराहून भिन्नच समजण्याची आहे.

म्हैसूर.

**महिषपुर** हें नांव **टिपुसुलतान**च्या ताब्यांत जो प्रांत होता त्यालाच असल्याविषयीं, **प्रोफेसर लॉसन्**चें मत आहे. ह्याचेंच **म्हैसूर** असें रूपांतर झालें असून, **अंबिकेनें महिषासु-**

---

१ हिंदुस्थानचा अर्वाचीन कोश.

राचा वध याच ठिकाणीं केल्यावरून, हें अन्वर्थ नांव त्या शहराला पडलें असल्याविषयीं आख्यायिका आहे.

गांडगापुर.

**गंधर्व पुराला** सांप्रतकालीं **गांडगापुर** असें ह्मणत असून, **पुण्यस्तंभाला पुणतांबें, रामगिरीला रामटेक,** आणि **वेणुग्रामाला बेळगांव,** असें ह्मणण्याचा हल्लीं प्रचार आहे.

करवीर क्षेत्र.

**कोल्हापूराला** करवीर किंवा **कोलापूर,** अशीं नांवें आहेत. संस्कृत शब्द कल्हार, हा कमलवाचक असून, ह्या शहरांतील बहुतेक सरोवरांत कमलसंचय असल्या कारणानें, त्यालाच कल्हारपुर अथवा कोल्हापुर असें नांव पडलें. करवीर हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, महाप्रलयाच्या वेळीं **श्रीमहालक्ष्मीनें** हा प्रदेश आपल्या करपल्लवांनीं उद्धृत केल्यावरून, तें नांव प्रचारांत आलें. तदनंतर कालेंकरून **कोला**नामक राक्षस ह्या प्रांतांत उन्मत्त झाल्यामुळें, ह्या शहरानजीकच्या उपागिरीवर त्याचा वध **श्रीजोतिबानें** केला, सबब त्याला **कोलापुर** असें ह्मणूं लागले.

तेथील प्रेक्षणीय स्थलें.

**कोल्हापुरांत** प्रेक्षणीय अशीं प्राचीन स्थलें म्हटलीं म्हणजे दोनच आहेत. १ **महालक्ष्मीचें** देवालय, व २ **रंकाळें** सरोवर. सदरहू देवालय **गंडुरादित्य** नांवाच्या राजानें बांधिलें असून, तें बांधण्याकरितां जे असंख्य दगड व

मृत्तिकेच्या राशी खर्च झाल्या, व त्यामुळें जो खाडा पडला, त्याचाच पुढें तलाव बनला असें म्हणतात. ह्या तलावाचा घेर दीड कोस असून, त्यांतील पाण्याची खोली ३९ फूट आहे. त्याच्या मध्यभागीं **श्रीरंकभैरवाचें** देवालय आहे, व त्यामुळेंच त्या तलावाला **रंकालय** अथवा **रंकाळें**, असें अन्वर्थ नामधेय पडलें आहे. त्यांतील देवळाचे कळस, पाणी अटलें म्हणजे, अद्यापिही दृष्टिगोचर होतात.

**कोल्हापूर** हें प्राचीनकाळीं विस्तीर्ण नगर होतें. परंतु इ० स० च्या आठव्या शतकांत भूकंपाच्या धक्यानें तें सर्व विध्वस्त होऊन लयास गेलें; व त्याच्या निशाण्या आजमितीसही व्याकीर्ण झालेल्या इतस्ततः सांपडतात. कोठें जीर्ण इमारती, कोठें त्यांचें सामान, व कोठें पूजा-साहित्य, इत्यादि अनेक प्रकार जमीन खंटली म्हणजे दृष्टीस पडतात. पूर्वी **महालक्ष्मीचें** देवालय सर्वांत उंच होतें, परंतु धरणीकंपानें त्याचें स्थित्यंतर होऊन, तें हल्लीं खोलगट जाग्यांतच आहे, असें उघड दिसतें.

त्याची प्राचीन व अर्वाचीन स्थिति.

ह्या शहराला पूर्वी सुमारें एक कोस घेराचा तट असून, तो कोठें सव्वीस फुट, व कोठें दहा फूट रुंदीचा होता. त्याची उंची तीस फूट होती, व त्याच्या सभोंवतीं खोल खंदक होता. त्याला एकंदर पंचेचाळीस बुरूज होते, व गोळ्या मारण्याकरितां तटाला जागोजागीं जंग्या असून,

शहरांत प्रवेश होण्याकरितां एकंदर सहा वेशी होत्या. हल्लीं बहुतेक सर्व तट जमीनदोस्त होऊन, त्याच्या भोंवतालाचा खंदकही बुजविण्यांत आला आहे.

सदरहूप्रमाणें घाटावरील विशेष महत्वाच्या स्थलांचें वर्णन केलें असून, आतां कोंकणांतील स्थानविशेषांचें दिग्दर्शन करूं.

परशुराम क्षेत्र, व कोंकण.

सह्याद्रि, व पश्चिम अथवा अरबी समुद्र, यांच्या दरम्यानचा जो प्रदेश त्याला कोंकण अशी संज्ञा आहे. ह्यालाच पूर्वी कुक्कण, कुक्कोण, किंवा शूर्पारक देश, असें म्हणत. सूतसंहितेवरून[1] सांप्रतच्या कोंकण प्रांतालाच कुक्कण अशी संज्ञा असल्याचें कळून येतें. भारतांत शुर्पारक हें नांव सहदेव दिग्विजयांत आढळत असून, त्या काळीं कोंकण हा परशुराम क्षेत्रापैकींच एक प्रांत मानीत असत. ह्या क्षेत्राचे त्यावेळीं सात[2] विभाग होते; आणि त्यापैकींच कांहीं भागाला पुढें ग्रीक लोकांनीं लिमिरिका अशी संज्ञा दिली होती. कोंकण प्रदेशाच्या उत्पत्तीविषयीं, एक प्राचीन व चमत्कारिक असें कथानक आहे कीं, परशुरामानें अखिल पृथिवी निःक्षत्रिय करून ती कश्यपास

---

१ कुक्कोण देशगायस्मात् कोंकणा नामतो भवन् ( सू. सं. )

२ १ केरलाश्च २ तुरंगाश्च तथा ३ गोराष्ट्रवासिनः । ४ कोंकणाः ५ करहाटाश्च ६ वरालाटाश्च ७ बर्बराः ॥ ४५ ॥

( सह्याद्रिखंड. स. २ अ. २८ मंगेशमहात्म्य. स. २. )

दिल्यावर, त्यानें सतत असा क्रम ठेविला कीं, त्या भूमींत पुनश्च क्षत्रिय आढळला कीं त्यास ठार मारावें. ही हत्या **कश्यप** ऋषीस न आवडून, त्यानें त्यास तेथून निघून जाण्यास सांगितलें. ही **भरतवर्षाची** भूमी **परशुरामानें कश्यपास** दान दिली असल्यामुळें, त्याला तेथून जाणें भाग[1] पडलें. तदनंतर, त्यानें सागराजवळ आपणास राहण्याकरितां जागा मागितली. परंतु ती त्यानें देण्याचें नाकारल्यावरून, समुद्रवलयांकित असा बराच भाग, **परशुरामानें** आपल्या पराक्रमानें व बाहुबलानें काबीज करून घेऊन, समुद्राची मर्यादा पुष्कळ दूर हटविली; व त्या प्रदेशालाच पुढें **शूर्पारक** ( सुपासारिखा[2] प्रांत ), किंवा **कोंकण**, असें नांव पडलें. प्लिनीच्या[3] ग्रंथांत सुद्धां, **कोंकणा**विषयीं वर्णन असून तेथील लोकांस तो **कोकंडी** ( Co-con--dae ) ह्मणजे **कोंकणी** असें म्हणतो. ह्यावरून, या प्रांताचें हल्लीं प्रचारांत असलेलें नांव देखील फार प्राचीन दिसतें; व **शूपारक** हें नांव त्याहीपेक्षां पुरा-

---

१ ततः शूर्पारकं देशं सागरस्तस्य निर्ममे।
सहसा जामदग्न्यस्य सोपरांत महीतलम्‌ ॥ ६७ ॥
( भारत शांतिपर्व. )

2. The journal. Bombay Branch. Royal Asiatic Society. vol. X No. 30.

3 Plinii. Naturalis Historia. Cunningham's Geography.

अंतर असावें, यांत बिलकुल शंका नाहीं. **कोंकण** प्रांताला **अरिअक** अशी संज्ञा असल्याविषयीं देखील कांहीं ग्रंथकारांचा अभिप्राय आहे.

**कोंकण** प्रांताची राजधानी **श्रीस्थानक** असून, यालाच हल्लीं **ठाणें** असें ह्मणतात. येथील राजाच्या ताब्यांत १४०० गांव होते, व त्याच्या राजधानीचें नगर **श्रीस्थानक**, हें पुर्वी व्यापाराच्या संबंधानें फारच भरभराटीच्या स्थितींत होतें. इ० स० १२९९ सालीं **व्हेनीस** येथील **मार्कोपोलो** नामक प्रसिद्ध प्रवासी इकडे आला असून, त्यानें इकडील स्थितीचें वर्णन केलें आहे.

कोंकणची राजधानी.

त्यांत तो असें लिहितो कीं, **श्रीस्थानक** अथवा **ठाणें** येथील राजा स्वतंत्र असून, तो मूर्तिपूजक होता. या ठिकाणचा व्यापार मोठा होता; व येथूनच कमावलेलें कातडें आणि जिन्नस दिगर ठिकाणीं निर्गत होत; व अन्य प्रांतांतील सोनें आणि रुपें या देशीं आयात होई. इ० स० १०१७ सालीं **ठाणें** येथें कांहीं शिलालेख सांपडले, त्यावरून असें कळून येतें कीं, येथील **शिलाहार** वंशांतील त्या वेळचे राजे हे आपगांस **कपर्दी**चे वंशज म्हणवीत असून, त्या वेळचा राजा इ० स० ९०० च्या सुमारास होऊन गेला होता.

ठाणें.

'प्राचीन **भारतीय** भूगोलवेत्ते हे **परशुराम** क्षेत्र,

वसई.

ह्मणजे **शुर्पारक** किंवा **कोंकण**, याचे सात विभाग मानीत असून, **वसई** प्रांत हा **वरालाट** नांवाच्या भागांत मोडत असे. या साती भागांत **ब्राह्मण** जातीचे निरनिराळे लोक राहत असत, व त्यांची भाषाही कांहींशी भिन्न होती. आणि त्या कारणानेंच ह्या क्षेत्राला **सप्तकोंकण** अशी संज्ञा पडली असावी, असें दिसतें.

"वस्" ह्मणजे राहणें, या **संस्कृत** धातूपासून **वसई** हा शब्द बनल्याचें उघड होतें. 'व' च्या ठिकाणीं 'ब' चा आदेश करून, **मुसलमान** लोक **बसई** ह्मणूं लागले. तदनंतर, त्याचेंच रूपांतर करून, **फिरंगी** अथवा **पोर्चुगीज** लोक **बशीम** ( Bacim ) ह्मणूं लागले. आणि पुढें त्याचाच अपभ्रंश होऊन **बसीन** असें रूप **इंग्रजींत** झाल्याचें आढळतें.

कांहीं शिलालेख व ताम्रपत्रें, यांजवरून हल्लीं असें कळून येतें कीं, **शिलाहार** वंशाकडील **वसई** वगैरे प्रांत इ० स० १२९० च्या सुमारास **यादव** वंशाकडे गेले; आणि इ० स० १२९४ सालीं **रामदेव** राजा राज्य करीत असतां, त्याला **अल्लाउद्दीनानें** जिंकून पदच्युत केलें. पुढें इ० स० १५०९ मध्यें **पोर्चुगीज** लोकांनीं **वसई** प्रांत सर करून घेऊन, त्या ठिकाणीं इ० स० १५२६ सालीं त्यांनीं आपली वखार घातली. आणि तदनंतर इ०

स० १५३६ या वर्षीं, **ननोडाकन्हानें वसई**चा किल्ला बांधून, त्या प्रांतांत **फिरंग्यां**ची सत्ता विशेष बलवत्तर केली.

निर्मलेश्वर, व तुंगारेश्वर.

**वसई** तालुक्यांतील हल्लींचें **निर्मलेश्वर** अथवा **विमलेश्वर**, आणि **तुंग** पर्वतावरील **तुंगारेश्वर**, हीं ठिकाणें सुप्रसिद्ध आहेत. **निर्मळा**ची जत्रा प्रतिवर्षीं **कार्तिक शुद्ध ११** ला भरत असते. याच ठिकाणीं **श्रीमत** प्रौढप्रताप, व जगद्विख्यात **श्रीशंकराचार्य**, यांचें देहावसान **सरस्वतीच्या** शापामुळें झालें असून, येथें त्यांची समाधिही बांधिली आहे. **निर्मल** हें ठिकाण, आणि **वसई**नजीकचा कांहीं टापू, हीं त्यावेळीं **पारभूमींत** मोडत असल्यामुळें, येथेंच देह विसर्जन होईल असा **शंकराचार्यांस सरस्तीनें** शाप दिला होता.

चौल व रेवदंडा.

**चंपावती**, व **रेवतीक्षेत्र**, हीं सांप्रतकाळीं **चौल** आणि **रवदंडा** या नांवानीं सुप्रसिद्ध असून **यथ** जलचरांच सांगाडे, समुद्रांतील वनस्पति, पाणथळ प्रदेश, शख, शिपल्या, व काटकक्कत गृहें, हीं विशेषप्रमाणानें उपलब्ध हातात. त्यामुळें, भूगर्भशास्त्रवेत्यांच्या दृष्टीनें इकडील जमिनीचे थर व तज्जन्य वनस्पति, हीं फारच प्रेक्षणीय आणि उपयुक्त आ-

---

१ पद्मपुराणांतील तुंगार महात्म्यांत, तुंगारेश्वराविषयीं सावंत वर्णन आहे.

हेत. चंपकपुष्पाच्या प्राचुर्यामुळें चंपावती असें नांव **चौलाला** पडलें असल्याविषयीं कांहींची समज आहे. परंतु हल्लीं सर्व **चौल** गांवांत, फक्त एका बागेंतच चंपक-पुष्पाचीं दहा बारा झाडें असल्याचें कळून येतें. कांहीं-जणांची अशी कल्पना आहे कीं, **विष्णुपुराणांतील चंपा** नामक राजानें ही नगरी स्थापन केल्यावरून तिला **चंपा-वती** हें नांव पडलें असावें. **पेरिप्लस्** नामक ग्रंथांत, **चौ-लाला** इ० स० ८० च्या सुमारास " **झिमोला** " अशी संज्ञा असून, इ० स० १३० सालीं **टालेमी**हा त्याला "**चि-मोला**" असें ह्मणतो. सातव्या शतकांत इकडे येऊन गेलेला एक **चिनी** प्रवासी त्यालाच **चिमोले** असें नांव देत असून, इ० स० ९१६ च्या सुमारास **मसुदी** नांवाचा एक **मुसलमान** गृहस्थ याच गांवाला **सैमूर** असें ह्मणतो. सदहू ग्रामासंबंधीं वर्णन करीत असतां तो असें लिहितो कीं, **लार** ( पश्चिम ) किनाऱ्यावर आपणास **सैमूर** ला-गलें असून, तेथें **बलहार** ( **शिलाहार** ) वंशांतील **जंजा** नामक राजा त्या वेळीं राज्य करीत होता. इ० स० १०१८ तला जो ताम्रपट कांहीं वर्षामागें **चौलाजवळ** सांपडला, त्यांत **जंज** राजा **चौलांत** राज्य करीत असल्या-विषयीं वर्णन आहे. इ० स० १०३० सालीं **अबूरिहन** हा त्या प्रांतांत गेल्यावेळीं, त्यानें त्या गांवाला **जेमूर** असें नांव दिल्याचें आढळतें. तदनंतरचा इ० स० ११५३ सालचा

लेख एड्रिसी याचा असून, तो ह्या गांवाला सैमूर असें ह्मणतो. येथें नारळीचीं झाडें आणि सुगंध वनस्पति ह्यांची विपुलता असल्यामुळें, तो माल अन्यदेशीं रवाना होतो, इत्यादि वर्णन करून, त्यावेळीं शिलाहार वंशांतील राजा राज्य करीत होता असें तो सांगतो. ह्याच चौलाच्या संबंधानें दुसरी एक सुप्रसिद्ध आख्यायिका आहे ती अशी कीं, भृगुऋषीचा च्यवन[1] नामक पुत्र या ठिकाणींच तपश्चर्येला बसला असल्यामुळें, त्याला चौल हें नांव पडलें असावें.

चौल येथील प्रेक्षणीय कामें, व राजघराणीं.

चौल येथें ३६० तळीं, आणि ३६० देवालयें असल्याविषयीं, फार प्राचीन काळापासून प्रसिद्धि आहे; व येथील कांहीं कांहीं कामें तर इतकीं सुंदर, मनोहर, आणि प्रेक्षणीय आहेत कीं, त्यावरून तत्कालीन लोकांचें पाऊल सुधारणेच्या संबंधानें पुष्कळच पुढें सरसावलेलें असल्याचें उघड दिसतें. सदरहू तलावापैकीं, एका तलावाजवळ कलका भवानीचें देवालय असून तें फारच प्रेक्षणीय आहे. ह्यांतील देवी मुसलमानी राज्यांत

---

[1] हाच पुढें च्यवन भार्गव या नांवानें प्रसिद्धीस आला. त्याचें कारण असें कीं, भृगूच्या गर्भिणी स्त्रीला कोणी एक राक्षस पळवून नेत असतां, तिचा गर्भ भीतीमुळें मार्गांतच च्युत झाला. आणि म्हणूनच च्युत गर्भापासून झालेला तो च्यवन असें त्यास नांव पडलें. ( भारत, आदि. अ. ४—६. )

त्यांच्या अन्यायी व जुलुमी वर्तनाला त्रस्त होऊन, नजीकच्या एका तडागांत अदृश्य झाली असल्याविषयीं दंतकथा आहे. **चौल** प्रांत **शिलाहार** वंशाकडेसच विशेषेंकरून असल्याचें दिसतें. कारण, तेथें त्या घराण्यांतील राजांचीं नाणीं जास्त सांपडतात. **तगर** नांवाचें निराळें घराणें नसून, **शिलाहार** घराण्याचाच तो किताब होता असें **प्रोफेसर भांडारकर** यांचें मत आहे. **चालुक्य, यादव,** वगैरे राजांचीं नाणीं देखील येथें सांपडतात. इसवी सनाच्या १३ व्या शतकांत, **चौल** येथें **यादव** वंशांतील **भीमराज** नामक राजा राज्य करीत असतां त्याचा पाडाव होऊन, **चौल,** व **रेवदंडा,** हीं **फिरंगी** आणि **मुसलमान** यांच्या हस्तगत झालीं.

रेवतीक्षेत्र.

**रेवदंडा** हें नांव **रेवा** या नदीवरून पडलें असल्याविषयीं तेथील लोक ह्मणतात. परंतु पुराणावरून,[1] व शिलालेखाच्या आधारें,[2] असें समजतें कीं, **श्रीकृष्ण** हा **गुजराथेंत** राज्य करीत असतां, त्यानें आपला बंधु जो **बलराम** याच्या पत्नीस उत्तर **कोंकणांतील** प्रांत दिला होता. हिचें नांव **रेवती** होतें; व त्या कारणानेंच त्या प्रांताला **रेवतीक्षेत्र** असें नांव पडलें, आणि त्याचाच पुढें **रेवदंडा** असा अपभ्रंश झाला.

---

१ कोंकणाख्यान. अ. ४–६.

२ Journal B. Br. R. A. S. vol. 12. No. 33.

परशुराम क्षेत्राची सीमा, व गोमंतक प्रांत.

**परशुराम** क्षेत्राची सीमा **गोमांतकपर्यंत** असल्याचें दिसून येतें. कारण " गौ " म्हणजे बाण, " मा " म्हणजे मान, आणि " अंत " म्हणजे शेवट, ह्या तीन संस्कृत शब्दांमिळून हा शब्द साधित झाला असल्यामुळें, **परशुरामानें** मारलेल्या बाणाची ज्या ठिकाणीं सीमा होते तें स्थल, असा त्याचा अर्थ होतो. ह्यालाच पूर्वी **गोवापुरी** अशी संज्ञा होती. हें बेट पूर्वपश्चिम साडे चार कोस लांब, व दक्षिणोत्तर तीन कोस रुंद असून, ह्याच्या पश्चिमेस तटासारखी एक मजबूत भिंत आहे. **सूतसंहितेंत**, ह्या बेटाविषयीं सुंदर वर्णन असून, त्या वेळीं तेथील लोक षट्कर्मसंपन्न, व तपोनिष्ठ असत, असें दिसतें.

> **गो**कर्णादुत्तरे भागे सप्तयोजन विस्तृतं ।
> तत्र **गोवापुरी** नामनगरी पापनाशिनी ॥ १ ॥
> **मंत्रौ**षधि तपोयोगबलेन जितमन्यवः ।
> **यस्मिन्** वसंति **विप्राश्च** षट्कर्म निरताः सदा ॥ ९ ॥
> ( सूतसंहिता. अ० १६. )

गोंवा बेट, व हिंदूलोकांचें धर्मांतर.

**गोवापुरीला** हल्लीं **गोंवा** बेट किंवा **तीसवाडी** म्हणतात. कारण, ह्या बेटांत तीस गांव आहेत. पूर्वी **गोंवा** बेटांसच **गोमांतक** ही संज्ञा होती. तथापि, हल्लीं त्याची व्याप्ति जास्त विस्तृत असून, तें नांव **गोंवें** सरकारच्या

ताब्यांत असणाऱ्या त्या लगत्याच्या सर्व मुलुखास लागू आहे. येथें प्राचीन काळीं **हिंदु** लोकांचीच वस्ति होती, व ते आपल्या आयुष्याचा विनियोग फारच सन्मार्गानें करीत असत, असें कळून येतें. त्यांतही विशेषतः **ब्राह्मण** लोक तर इतके सदाचारी, जितेंद्रिय, मंत्रौषधि विद्येंत निपुण, योगबलांत कुशल, व तपोबलांत इतके श्रेष्ठतर होते कीं, त्या जागेला पापनाशिनी किंवा पुण्यभूमि ह्मणत. असें असतांही, हल्लींची त्या जागेची स्थिति कांहीं विपरीत दिसत आहे. प्रथमतः **मुसलमान** लोकांची **कुराण समशेर**शाही, आणि तदनंतर **फिरंगी** लोकांचा जुलुमानें बाटविण्याच्या संबंधानें अति निंद्य क्रम, हीं एकामागून एक सुरू होऊन, तेथें यथेच्छ धुडकुस चालला. त्यामुळें अत्यंत विटंबना होऊन, हजारों **ब्राम्हण** देशांतरीं गेले. शेंकडों कुळें भ्रष्ट झालीं. आणि कित्येकांची तर अगदींच वाताहात होऊन गेली. त्या कारणानें उघडच **क्रिस्ताव** लोकांचा पगडा बसून, त्या धर्माचें विशेष प्राबल्य दिवसानुदिवस वाढत चाललें, आणि **हिंदु** कुलबीजावर तर साहजीकच इतस्ततः सर्वांशींच नांगर फिरला. **काला**चा महिमा अगाध असून, त्याची गतिही कांहीं विचित्र आहे ! ! !

यत्रानेकः क्वचिदपि गृहे तत्र तिष्ठत्यथैको
यत्राप्येकस्तदनु बहवस्तत्रचांते न चैकः ।
इत्थं चेमौ रजनि दिवसौ दोलयन्वापि चाक्षौ

**काल:** काल्यासह बहुकल: क्रीडति प्राणिशारै: ।
( भर्तृहरि. वैराग्यशतक. ).

**गोंव्याला सिद्धपुर** अशीही संज्ञा असल्याविषयीं, कांहीं **संस्कृत** व **कानडी** ताम्रपटांवरून सिद्ध होतें. सिद्धपुर ह्याचेंच **सिंदवूर** ( Sindavur ) असें रूपांतर **आरबी** ग्रंथांत झाल्याचें आढळतें.

सिद्धपुर.

**गोवा**पुरीच्या उत्तरेस नजीकच **चुंडामणि** नांवाचें बेट असून त्याला सांप्रतकाळीं **चोडण** असें म्हणतात. **सह्याद्रि** खंडांत सदहू स्थलाविषयीं खालीं लिहिल्याप्रमाणें वर्णन आहे.

चूडामणि नामक द्वीप.

मुने गोमांचले तीर्थे भिद्रनाभा भिदंशुभम् ।
हरि चूडामणि क्षेत्रे महापुण्यकरं स्मृतम् ॥ १ ॥
( स. खं. अ० ८३. )

**चूडामणी**च्या आग्नेयी दिशेस, **दीपवती** अथवा **पंचक्रोशी** नांवाचें बेट असून **दीप**वतींचेंच **दिवाडी** असें सांप्रतचे रूपांतर झालें आहे. ह्या दोन्ही ठिकाणीं हल्लीं किरिस्ताव लोकांचीच वस्ती फार आहे.

दीपवती अथवा पंचक्रोशी.

1. Journal Bombay Branch. Royal Asiatic. Society. vol. XI: No. 32.

ह्या बेटाचें वर्णन **सह्याद्रि**खंडांत खालीं लिहिल्याप्रमाणें आढळतें:—

गंगा तु मध्यमे भागे क्षेत्रं दीपवति स्मृतम् ।
कोशद्वयंच विस्तीर्णं केवलं पुण्यवर्धनम् ॥ १ ॥
( स. खं. अ० ८३. )

आज्यद्वीप व त्याची आख्यायिका.

**गोंव्या**पासून सुमारें पंचवीस कोसांवर **आज्यद्वीप, आदिद्वीप**, किंवा **अंजेदिव**, या नांवाचें सुंदर आणि चिमुकलेंसें बेट दक्षिणेस आहे. यांतील झाडी एकसारखी व हिरवीगार असल्यामुळें, हें अत्यल्प भूमिखंड **अरबी** समुद्राच्या प्रचंड वारिराशीवर जणुकाय कंदुकाप्रमाणेंच, तरंगत असल्यासारखें दिसतें. **परशुरामानें** निःक्षत्रिय पृथिवी करून **अश्वमेध** करण्याचें आरंभिल्यावर, तत्संबंधीं द्रव्याची सर्व जमवाजमव झाली. परंतु अति महत्वाचें होमद्रव्य जें आज्य ह्मणजे तूप, तें मिळण्याची फारच पंचाईत पडली. तेव्हां, ती आकस्मिक उद्भवलेली अडचण, त्या द्वीपांतील आज्य ह्मणजे तूप मिळाल्यामुळें, बिनबोभाट दूर होऊन, त्याचा यज्ञ सिद्धीस गेला. व म्हणूनच त्या बेटास **आज्यद्वीप** हें नांव पडलें असल्याविषयीं एक आख्यायिका आहे. दुसरी आख्यायिका अशी आहे कीं, सांप्रतचें **परशुराम** क्षेत्र निर्माण होण्यापूर्वींच हें बेट अस्तित्वांत असल्यामुळें, त्याला

**आदिद्वीप** अशी संज्ञा होती. तिसरी आख्यायिका अशी सांगतात कीं, ह्या बेटांत **अजा** नांवाची देवी असून, तिचें वसतिस्थान या अर्थानें, **अजाद्वीप** असें नांव त्या बेटास पडलें. व त्याचाच पुढें **अंजेदिव** हा अपभ्रंश झाला. हीच देवी हल्लीं **अंकोला** येथें **कारवार** किनाऱ्यावर आहे; व ती त्या ठिकाणीं, **मुसलमानांच्या** विटंबनेपासून बचाव होण्यासाठीं, ह्या बेटांतूनच नेली असल्याचें सांगतात. ह्या बेटानजीकच्या द्वीपसमुहासच **ग्रीक** लोक " अंजीडिओरम्‌इन्सुला "( Angidiorum Insula ) असें म्हणत. **मलकी**चे डोंगर, व त्या नांवाचीं बेटें, हीं देखील नजीकच असून, तेथें व **गोंवें** बेटांत खटलें असतां, कधीं कधीं काळ्या व निळ्या रंगाचे, लांकडाचे आणि धातूचे, त्रिशूळ सांपडतात. हे त्रिशूळ ज्योतिषसंबंधानें वेध घेण्याकरितां हिंदूलोकांनींच केले असून, तीं केवळ त्रिशंक्वाकृति वेधयंत्रेंच होत, व तीं अखिल **भरतखंडांत** पुष्कळ ठिकाणीं आढळतात, असें विद्वज्जनांचें म्हणणें आहे.

केरलप्रांत, व मलबार किनारा.

**केरल** हा **मलबार** किनाऱ्यावरील **कालिकत**च्या आसमंतांतील प्रदेश होय. ह्याचा कांहीं भाग **मद्रास** इलाख्याखालीं असून, कांहीं भाग **त्रावणकोर** संस्थानच्या ताब्यांत आहे. येथें फार प्राचीनकाळीं, **चंद्र**-

**हास्या**चा बाप **सुधार्मिक** हा, **पांडवांच्या** पूर्वी राज्य करीत होता. **सह्याद्रीच्या** पश्चिमेकडील किनाऱ्याला **केरल** अथवा **मलयवर** असें म्हणत, सदरहू शब्दाचाच ( मलयबर=मलबर= ) **मलबार** हा अपभ्रंश झाला आहे.

चोल देश, व कारोमांडल किनारा.

**चोल**[3] हा **दक्षिणपथां**तील पूर्व किनाऱ्यावरील प्रदेश होय. हा देश **धनककटा**पासून ८४ कोसांवर असल्याविषयीं, प्रसिद्ध **चिनी** प्रवासी **हूणसंग** याच्या वर्णनांत आहे, व तो ह्या देशाला **चुलीय** किंवा **जुलीय** अशी संज्ञा देतो. त्यावरून **चोल** देश हा **अर्काटाच्या** उत्तरेकडे असून, याच्या दक्षिणेस **द्रविड** व **पांड्य देश** होते असें दिसतें. **चोल** प्रदेशावरूनच पूर्व किनाऱ्याला **चोलमंडल** हें नांव पडलें. आणि त्याचाच अपभ्रंश होऊन सांप्रतचें **कारोमांडल** असें रूप झालें आहे.

**चोल** व **कलिंग** या देशांतून गेलेली, व उत्तर दक्षिण

---

१ भारत सभापर्व. अ० ३१.

२ महाभारत सभापर्व. अ० २७

३ तेषांपरे जनपदा दक्षिणाः पथवासिनः
पांड्याश्च केरलाश्चैव चोलाः कुल्यास्तथैवच ॥ ४ ॥
मत्स्यपुराण. अ० ११३.

पूर्वघाट, अथवा महेन्द्र, व नील पर्वत.

अशी विसृत झालेली जी पर्वतपंक्ति दृष्टिगोचर होते, तिला **पूर्वघाट** अशी सांप्रतकाळीं संज्ञा असून, तिचें प्राचीनचें दक्षिणेकडील भागाचें नांव **नीलमलय**, आणि उत्तरेकडील भागाचें नांव **महेंद्रपर्वत**, असें होतें. हा पर्वत **भरतवर्षां**तील सुप्रसिद्ध असलेल्या सात पर्वतांपैकीं असून, त्याचा उल्लेख पुराणांतरींही आढळतो. याच पर्वतावर **जामदग्न्य** ऋषीची वस्ती असल्यामुळें त्याला भेटण्याकरितां **युधिष्ठिर** येत असे, अशी पौराणिक आख्यायिका आहे. तुमलगड, **पम**मलगड, आणि **च**तुरगड वगैरे ह्या पर्वतांचीं अर्वाचीन नांवें आहेत. **नीलमलय** असें नांव पडण्याचें कारण असें दिसतें कीं, ह्या ठिकाणीं निळीचें पीक पुष्कळ प्रमाणानें होतें. आणि त्या कारणानेंच नगरें किंवा शिखरें, अथवा पर्वत, यांचीं नांवें तत्संज्ञक अशीं इकडील प्रदेशांत आढळतात. उदाहरणार्थ, ह्या पर्वताला **नीलमलय**, त्याच्या उच्च शिखराला **नीलगिरि**, आणि त्याच्या आग्नेयीस जें एक मोठें शहर आहे त्याला **नीलवर** असें ह्मणतात. त्या **नीलवरा**चाच हल्लीं **नेलोर** हा अपभ्रंश झाला आहे.

---

१ सप्तवास्मिन् महावर्षे विश्रुताः कुलपर्वताः ।
महेंद्रो मलयः सह्यो भुक्तिमान् ऋक्षवानपि ॥

२ मत्स्य पुराण. अ० ११३.

३ भारत. प्रा. ऐ. को. पान ४३१. भारतवनपर्व. अ० ११४

पांड्यदेश.

**पांड्य देश द्रविड** देशाच्या नैऋत्येस असून त्या-विषयीं **भारतांत** उल्लेख आहे. **सह-देव** दिग्विजयांत असें वर्णन आहे कीं, हा पराक्रमी राजकुमार **भरतखंडाचें** जें थेट दक्षिणचें टोंक **कन्याकुमारी,** तेथपर्यंत आपल्या जयपताकांसहित जाऊन थडकला होता; व त्यानें **दक्षिणपथांतील** सर्व मांडलिक प्रभूंपासून करभार घेतले; आणि तेथूनच तो परत फिरला. त्या वेळेस त्याला अनुक्रमें **पांड्य, द्रविड,** व **केरल,** असे देश लागले.

कुमारि भूशिर.

**भरतखंडाच्या** अगदीं दक्षिणच्या टोंकाला जें प्रसिद्ध भूशिर आहे त्याला **कुमारी** अशी संज्ञा असून, **कुमारी** नामक देवीवरूनच सदरहु भूशलाकेला तें नांव प्राप्त झालें. **तामिल** भाषेंत त्या शब्दाचा **कामरी** असा अपभ्रंश होऊन, त्याचेंच **कॉमोरिन्** असें रूपान्तर **इंग्रजी** भाषेंत झालें आहे.

लंका बेट, व त्याचीं दुसरीं नावें.

**भरतखंडाच्या** दक्षिणेस विशेष प्रख्यात असे एक मोठें द्वीप आहे, व त्याला **लंका, सिंहलद्वीप, ताम्रपाणी, रत्नद्वीप,** अशा अनेक संज्ञा आहेत. ह्या सर्वांत फार प्राचीन असें नांव म्हटलें म्हणजे **लंका** होय. हें नांव त्या नांवाच्या देवीवरून पडलें असल्याचें कळून येतें. **सीताशुद्धिसाठीं** ज्यावेळेस **मारुतीनें लंकेंत** प्रवेश केला,

तेव्हां प्रवेश होण्यापूर्वी त्याचें ह्या लंकादेवतेबरोबर बरेंच वाग्युद्ध झालें असल्याविषयीं रामायणांत कथानक आहे.[1]

सिंहलद्वीप.

पुढें कालवशात् सिंहल राजाच्या मुलानें हें बेट जिंकून आपल्या हस्तगत करून घेतलें, व म्हणूनच त्याचें नांव सिंहलद्वीप असें पडलें. ह्या मुलाचें नांव विजय असून त्यानें तें बेट इ० स० पूर्वी ५४३ व्या वर्षी, बुद्ध निर्वाणाच्या वेळीं सर केलें. तेव्हां त्या विजयी पुरुषाची सेना त्या द्वीपांत असतां, तेथल्या तांबड्या मातीनें त्या सर्वांचे हात लाल झाल्यामुळें, त्या भूमीला ताम्रपाणि असें म्हणूं लागले. तदनंतर निरक्षदेश

ताम्रपाणि.

हें नांव, विद्वन्मुकुटमणि व जगद्वंद्य ज्योतिषी भास्कराचार्य, यांच्या वेळेपासून प्रचारांत आलें. त्याचें कारण असें कीं, ह्या व

निरक्षदेश.

इतर प्राच्य ज्योतिषांची उत्तर अक्षांश गणना लंकाबेटापासून होत असे. आणि लंका बेटाचे अक्षांश ते शून्य (०) मानीत असल्या कारणानेंच त्या बेटाला त्यांनीं निरक्षदेश असें नांव दिलें; व तेथपासूनच इतर स्थलांचें परिगणन करावयाचें, असा त्यांनीं

---

१ वाल्मिकी रामायण. सुंदरकांड. सर्ग ३.

२ अवंती अथवा उज्जयिनी नगरीच्या लांबीचें प्रमाण भास्कराचार्यांनीं निरक्षदेश किंवा लंका ह्यास अनुलक्षुनच दिलें आहेः-

( पुढें चालू )

परिपाठ चालला. आतां अर्वाचीन भूगोलवेत्त्यांच्या परिगणनेप्रमाणें, सांप्रतचें लंका बेट ९ व १० उत्तर अक्षांश यांच्या दरम्यान असून, भास्कराचार्यांच्या वेळीं हेंच बेट शुन्य (०) अक्षांश जवळ कसें होतें, ह्याविषयीं प्रथमदर्शनीं तरी कांहींच मेळ मिळत नसल्यामुळें, मोठा अचंबा वाटतो. परंतु सूक्ष्म दृष्टीनें, उदकशक्ती व अंतर्गतशक्ती, यांच्या विलक्षण प्रभावाकडे चांगलें लक्ष पुरविलें तर असें दिसून येईल कीं, ह्या पृथिवीच्या पाठीवरील अनेक देश अथवा भूभाग दृग्गोचर असलेले पाण्यांत गडप झाले. व हिमालयासारिखे अत्युच्च पर्वत उदधिवीचींत पूर्वी अंतर्धान पावलेले असतांही, त्यांनीं आपलीं डोकीं कालेंकरून वर काढून, ते आतां नयनविषय झाले. त्याप्रमाणेंच ह्या बेटाचेंही स्थित्यंतर झालें असावें. सिंधु, गंगा, यमुना, आणि ब्रह्मपुत्रा, वगैरे मोठमोठ्या नद्यांचें पात्रांतर, व शेंकडों कोसांचें प्रवाहांत स्थलांतर; मच्छलीपत्तनाची जलसमाधि; आणि

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालू)

निरक्षदेशात् क्षिति षोडषांश
भवेदवन्ती गणितेन यस्मात् ।
तदंतरं षोडश संगुणं स्यात्
भूमान मस्माद् बहु किंतदुक्तम ॥ १ ॥

१ अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या ओषधयः ॥ (उपनिषद्).
Geikie's Geological Primer. Cooke's Geology and Geographical Primer.

पेरिमद्वीपाचें उन्मज्जन; इत्यादि गोष्टींच्या अनुभवावरून, ह्या निरक्षदेशाचेंही स्थित्यंतर असंभवनीय वाटत नाहीं. ह्या देशाला चिनी लोक पोचा असें ह्मणत असून, त्या शब्दाचा अर्थ चिनी भाषेंत " मरकतादिमणि, व मौल्यवान् रत्नें, यांचें द्वीप, " असा होतो. आणि रत्नद्वीप असें जें ह्या बेटाचे नांव आहे, त्यावरूनच हें अन्वर्थ नांव चिनी लोकांनीं दिलें असल्याचें दिसतें.

रत्नद्वीप.

ताम्रपाणि याचा अपभ्रंश पाली भाषेंत "तांमपानि" असा झाला असून, त्याचेंच Topro Bane टाँप्रोबेन असें रूपांन्तर प्लिनी वगैरे पाश्चात्य ग्रीक लोकांच्या ग्रंथांत दृष्टीस पडतें. तसेंच सिंहलद्वीप याचें रूपांतर टालेमीनें सालिकी, आरबी लोकांनीं झिल्लन्, व आबुरीहन यानें सिंगलदीब असें केलें असून, ह्याचाच सेरिंदीव, अथवा इंग्रजींत सीलोन असा अपभ्रंश झाला आहे. ह्या बेटाची माहिती युरोपस्थांस इ० स० पूर्वी ३२७ वर्षेपर्यंत बिलकुल नसून, ते ह्या बेटाला एक स्वतंत्र खंडच समजत असत, असें प्लिनी ह्मणतो.

टाप्रोबेन.

सालिकी.

झिलन्.

सेरिन्दीव व सीलोन.

१ हें बेट खंबायताच्या आखातानजीक असून, तें पाण्यावर दिसूं लागल्याला अजमासें तीस वर्षें झालीं.

प्रथमतः हें बेट दिग्विजयी आर्य लोकांनीं जिंकून त्यांनीं त्या ठिकाणीं आपली चांगली वसाहत केली होती. येथील राजधानी कांहीं दिवस अनुराधापुर, व कांहीं दिवस पौलस्तिपुर होती. इ० स० ११६९ सालीं येथें पराक्रमबाहु नामक राजा राज्य करीत असून, तो आपल्या नांवाप्रमाणेंच खरोखरी महापराक्रमी व बहुत शूर होता. त्यानें भरतखंडाच्या दक्षिणेकडील चोल व पांड्य नांवाचे देश जिंकून आपल्या राज्यांत अनेक प्रकारची सुधारणा केली; ठिकठिकाणीं पाण्याची मोठीं कामें बांधिलीं; जागोजागीं कालवे नेले; जरुर त्याठिकाणीं बंधारे घातले; आणि आपल्या नांवाचें नाणें पाडून, प्रजेच्या कल्याणाकडे सर्व प्रकारें लक्ष दिलें. ह्या राजाला लंकेश्वर असेंही म्हणत असून, त्याच्या वेळची नाणीं आणि शिला लेख, अजून देखील कोठें कोठें सांपडतात.

पौलस्तिपूर

लंकेच्या दक्षिणेस, सुमारें नैर्ऋत्य दिशेला, बऱ्याच लांबीच्या पल्यावर, मारीच नांवाचें द्वीप मादागास्कर बेटाच्या पूर्वेस आहे. ह्या ठिकाणीं पूर्वी मारीच नामक राक्षसाची वस्ती असल्यामुळें, तत्संज्ञक असें नांव त्या बेटाला पडल्याचें दिसतें. व मारिच द्वीपाचेंच सांप्रत मारिशिअस् असें रूपांतर झालें आहे. ह्या मारीच

मारीच द्वीप, व त्याचें कथानक.

राक्षसाविषयीं असें कथानक आहे कीं, विश्वामित्र ऋषि यज्ञ करीत असतां, त्याला ह्या व दुसऱ्या अनेक राक्षसांनीं विघ्नें केलीं. त्यावेळीं, रामानें त्यांच्याशीं युद्ध करून शस्त्रप्रहार केला, आणि क्वचित् प्रसंगीं शरसंधानही राचिलें. त्यांत रामाचा बाण मारीचाला लागून तो समुद्रांत जाऊन पडला, व नंतर ह्या बेटावर त्यानें वस्ती केली. हीच हकीकत रावणाला सांगत असतां, मारीच असें ह्मणाला कीः—

आगतोहमथ हंतु मुद्यतो
मांविलोक्यशरमेकमाक्षिपत् । ( रामः )
तेनविद्ध हृदयोहमुद् भ्रमन्
राक्षसेन्द्र पतितोस्मि सागरे ।
॥ २०-२१ ॥ अ. स. ॥ ४०-४१ ॥

तदनंतर रावणाच्या सांगीवरून त्यानें हें बेट सोडलें, आणि कनकमृगाचें रूप धारण करून सीता ज्या ठिकाणीं होती तेथें गेला, व त्या ठिकाणीं रामाच्याच हातून तो प्राणास मुकला.

---

१ अरण्यकांड. स. ३७-३९ वाल्मीकी रामायण.

# शुद्धीपत्रक.

## प्रस्तावना.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| २ | २२ | Jocolliot. | Jacolliot. |

## अनुक्रमणिका.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| ४ | ११ | कौंडिन्यपुर | कौंडिन्यपुर |
| " | १५ | चौक | चौल |
| " | २० | महेन्द्र नील | महेन्द्र व नील |
| " | २३ | त्याचे | त्याचें |

## मूलग्रंथ.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| ११ | २२ | शवटचा | शेवटचा |
| १५ | १३ | अगदीं हा जणू काय ओत प्रोत भरलाच | हा जणू काय अगदीं ओत प्रोतच भरला |
| १८ | ७ | hysterics. | hysteric. |
| २४ | २२ | आचवलें | आचवलों |
| ३१ | १८ | कालचकानें | कालचक्रानें |
| ३७ | ९ | श्रुनःशेप | शुनःशेप |
| ३८ | १० | त्याजला | त्यांजला, |
| ३९ | १ | भील | भील, |
| ४१ | १० | प्रकारचें | प्रकारचे |
| ४६ | १ | मुढ | गूढ |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४७ | ८ | केली | केलेली |
| ५० | ६ | स्वयांसतु | सतु |
| ,, | ५ | मनुर्पैवस्वतः | मनुर्वैवस्वतः |
| ५१ | ५ | वभूवा | बभूवा |
| ,, | २५ | प्रशश्रुवः | प्रशुश्रुवः |
| ५२ | ५ | राजांचा | राजांची |
| ,, | ९ | गेलं | गेले |
| ,, | १६ | अबरीषस्य | अंबरीषस्य |
| ५६ | १९ | गेला | गेलीं |
| ५८ | १२ | पाश्चात्यकालाच्या | पाश्चात्य हे इकडील कालाच्या |
| ६० | १० | म्हणणें. आहे | म्हणणें आहे. |
| ,, | १६ | शात्रुपासून | शात्रूपासून |
| ६५ | १६ | come | came |
| ६७ | १७ | केले | केलें |
| ६९ | ७ | नव्हत | नव्हते |
| ८२ | ५ | अध्र | अंध्र |
| ८६ | १३ | असन | असून |
| ,, | २० | सांमतचे | सांप्रतचे |
| ,, | ,, | मळचें | मूळचें |
| ९० | ४ | मुळ | मुळें |
| ९४ | १८ | कलदगी | कलादगी |
| ९९ | २ | बनविले | बनविलें |
| ,, | ६ | १ | २ |
| ,, | २० | द | र |
| १०१ | १८ | अद्भूत | अद्भुत |
| १०६ | ८ | देश | इत्यादि देश |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| १०९ | २ | किक्रमा दित्यानें | विक्रमादित्यानें |
| ,, | १५ | आच | आच[२] |
| ,, | १७ | होय्सळास[६] | होय्सळास[३] |
| ११२ | २० | वाजकिरण | वाजीकरण |
| १२१ | १२ | केणत्या | कोणत्या |
| १२६ | ८ | होतें | होतें. |
| १२८ | १७ | ब्रह्मणाकडे | ब्राह्मणाकडे |
| १२९ | ९ | पांड्ये | पांड्य |
| १२९ | १७ | किंता | किंवा |
| १३२ | १९ | वेचो | वचो |
| १३७ | १५ | निवृंत्ति | निवृत्ति |
| १४० | १९ | ब्रह्मवर्त | ब्रह्मावर्त |
| १४५ | १३ | होती | होती. |
| १६० | ९ | रखांशरेषा | रेखांशरेषा |
| १६९ | १७ | सिंह | सिंहल |
| १७८ | २० | ( स. सं. ) | ( सू. सं. ) |
| १८२ | १३ | सरस्तीनें | सरस्वतीनें |
| ,, | १६ | जलचरांच | जलचरांचें |
| ,, | १९ | जमिनाचे | जामिनीचे |
| १८८ | १३ | तीर्थ | तीर्थे |
| १९१ | ३ | म्हणत, | म्हणत. |

